# मानवी कुटुंब आणि हिंदुस्थान



लेखक:—

डॉ. गॉल्थेरस्. एच. मीज.

M. A. ( Cantab ), LL. D. ( Leyden ).



अनुवादक:—

अनंत सखाराम काशीकर. बी. ए.



मूल्य १ रुपया

[कलदार]



सप्टेंबर ] हैद्राबाद दक्षिण [ १९४०

प्रकाशक—

अ. स. काशीकर. बी. ए.

६०९, मुलतान बाजार,

प्रथमावृत्ति १९४०

---

डॉ. मीज यांनीं आपल्या पुस्तकाचा अनुवाद करण्याची परवानगी देऊन मला मराठी वाङमयाची अल्पशी सेवा करण्याची सुसंधी दिली याबद्दल मी त्यांचें मनःपूर्वक आभार मानतो तसेंच ज्या सुप्रसिद्ध साहित्यसेवकांनी माझ्या नम्र विनंतीला मान देऊन आपले अभिप्राय पाठविले त्यांचासुद्धां मी अत्यंत आभारी आहे.

—अनुवादक.

---

मुद्रक—

राजस्थान मुद्रणालय

मुलतान बाजार हनुमतगंज

हैद्राबाद दक्षिण.

" We realise that it is before all things useful to associate our ways of life, to bind ourselves together with such bonds as are most fitted to gather us all into unity, and generally to do whatsoever will serve to strengthen friendship."

-*Spinoza*.

भावार्थ:—

" आपल्या जीवनमार्गांची संगति साधणें, आपणांत ऐक्यभावना जागृत राहील अशा प्रकारच्या प्रेमरज्जुंनीं आपणांस बद्ध करून घेणें आणि सर्व-साधारणत. आपापसांतील मित्रत्वाचें नातें वृद्धिंगत होईल अशा क्रिया करणें ही सर्वांत उपयुक्त गोष्ट आहे हें समजण्यातच अखिल मानवजातीचें कल्याण आहे.

-स्पिनोझा.

# अनुवादकाचें आत्मनिवेदन.

" अंतरराष्ट्रीय विचार-विनिमय हीच जागतिक प्रश्न सोडविण्याची गुरुकिल्ली होय " ( थॉमस् हार्डी. )

( The exchange of international thought is the only salvation of the world ) *Thomas Hardy.*

कांहीं महाराष्ट्रीय व कांही आंग्लभाषेंतील वृत्तपत्रांत व मासिकात प्रस्तुत पुस्तकावरील अभिप्राय वाचण्यांत आले. पुस्तक वाचलें व पुस्तकांतील विचारसरणी उद्बोधक व विचारप्रवर्तक वाटल्या-मुळें त्याचा मराठींत अनुवाद करण्याची स्फूर्ति झाली. लेखकाशीं पत्र-व्यवहार करून त्याची परवानगी घेतली. त्याप्रमाणें अनुवाद संपूर्ण झाल्यावर कांहीं प्रकाशकांशीं पत्रव्यवहार केला, परंतु बहुतेकांची निराशेचीच उत्तरें आलीं. मग मनात आलें कीं स्वतांच मुद्रणाला सुरवात करावी. त्याप्रमाणें थोड्याफार प्रयत्नांतीं हें कार्य प्रस्तुत स्वरू-पांत परिपूर्ण झालें.

पुष्कळशा इंग्रजी पुस्तकांची भाषांतरें आपल्या महाराष्ट्र वाङ्मयांत प्रसिद्ध झाली आहेत, त्यांतच आपणही थोडीफार भर घालावी या दृष्टीनें हें कार्य हातीं घेतलें. अर्थात् पुस्तकाची निवड योग्य कीं अयोग्य हा प्रश्न वाचकांच्या मनोभूमिकेवर अवलंबून राहणार. पुस्तकां-तील राजकीय, धार्मिक, सामाजिक व जागतिक इत्यादि विविध दृष्टींनीं एकंदर विषयाचें तात्त्विक विवेचन अरेंच मार्मिक व उद्बोधक वाटलें म्हणूनच याची निवड केली.

मानवी कुटुंबाचें मूळ वसतिस्थान कोणतें व त्यांतील मूळ पुरुष कोण व पुढें त्याचा विस्तार कसा होत गेला इत्यादि प्रश्नांचीं समर्पक उत्तरें देण्याकरता मानवी समाजाचा इतिहासच लिहावा लागेल. परंतु प्रस्तुत स्थळीं हिंदुस्थानदेश हाच मानवी कुटुंबाचा मूळ पुरुष होय असें विधान केल्यास तें अतिशयोक्तिचें ठरणार नाहीं असें वाटतें. त्याचें कारण असें कीं, अतिप्राचीन अशा इतिहासपूर्व कालामधें मानवी संस्कृतिच्या उषःकालाचें स्वरूप आपणास जागतिक वाङ्मयांत आद्य-ग्रंथाचें स्थान प्राप्त झालेल्या ऋग्वेदात सापडतें. यावरूनच हिंदुस्थानचा सांस्कृतिक दृष्टया उल्लेख करताना पौर्वात्य व पाश्चात्य विद्वान्, ' हिंदुस्थान हें मानवी संस्कृतिचें उगमस्थान होय ' ( India is the cradle of human Culture ), आणि ' प्राचीन व अर्वाचीन जगाचें सांस्कृतिक प्रभुत्व याच देशाकडे येतें ' ( Cultural mistress of the ancient and modern worlds ) इत्यादि विशेषणें उपयोगांत आणतात. मानवी समाजाचें मूळ निवासस्थान मध्य आशिया मानलें जातें हें जरी खरें असलें तरी मानवी समाजाचें सांस्कृतिक दृष्टया रम्य व उज्वल स्वरूप आपणाला ऋग्वेदांतर्गत वर्णनांतच दृष्टोत्पत्तीस येतें, हें सर्वमान्य झालें आहे. यावरूनच हिंदुस्थान सांस्कृतिक दृष्टया कसा मूळपुरुष आहे हें थोड्या फार प्रमाणात सिद्ध होतें.

युद्धोत्तरकालांतील वैज्ञानिक प्रगतिनें स्थल व काल यांच्या मर्यादा नाहीशा केल्या गेल्या व या दृष्टीनें विश्वाचा संकोच होऊं लागला. यामुळें राष्ट्रांराष्ट्रांतील दळणवळणाची बरीच वाढ झाली, व पाश्चात्य राष्ट्रांतील विद्वान लोक भारतीयजीवनांतील धार्मिक, सामाजिक,

राजकीय व सांस्कृतिक इत्यादि विविध विभागांचा सखोल अभ्यास करूं लागलें. अशामुळें वैचारिक संघटनास बरीच चालना मिळाली. या दृष्टीनें प्रस्तुत लेखकानें भारतीय समाजरचनेचा व समाजघटनेचा बराच अभ्यास करून हेंच सिद्ध केलें आहे कीं, मानवी संस्कृतिची जागतिक पुनर्घटना व पुनर्रचना सर्व राष्ट्रांतील विचारवन्त विद्वानांनीं सर्वंकष अशा वैचारिक भूमिकेवरून करावी म्हणजे मानवी जीवन सर्वदृष्टींनीं अत्यंत सुखप्रद व कल्याणप्रद ठरेल. याच अर्थाचें शिरोभागीं उद्धृत केलेलें थॉमस् हार्डीचें वचन आहे. तेव्हा बौद्धिक सहकारिता व अंतर-राष्ट्रीय विचार–विनिमय हीच जागतिक प्रश्न सोडविण्याची गुरुकिल्ली होय असें सिद्ध होतें.

लेखकानें काहीं भारतीय सामाजिक सिद्धांत कसें विश्वव्यापक स्वरूपाचें आहेत हें दर्शविलें आहे, विशेषतः चातुर्वर्ण्यव्यवस्था ही तर जागतिक संस्कृतिला एक अत्यंत अमोलिक अशी देणगीच होय असेंही म्हटलें आहे. पुढें वर्णसंकराचें स्वरूप कसें असतें व सांस्कृतिक वर्गाच्या वर्णसंकराचें कसें वाईट परिणाम होतात हेंही विशद केलें आहे. संकुचित राष्ट्रीयतेची विफलता व खऱ्या राष्ट्रीयत्वाची व खऱ्या अंतर-राष्ट्रीयत्वाची सद्यःकालीन जगाला किती आवश्यकता आहे याचें योग्य दिग्दर्शन केलें आहे. शेवटच्या प्रकरणात समाजाच्या जीवनाला खरे ब्राह्मण व खरे क्षत्रिय याची अत्यंत आवश्यकता कशी असतें हेंही स्पष्ट केलें आहे. नंतर काहीं प्रचलित राज्यपद्धतींचा परामर्ष घेऊन व त्यांतील गुणदोषविवेचन करून, शेवटीं समाजातील उच्च वर्गांतील शील-संपन्न वैज्ञानिक व साहित्यिक यांच्या प्रयत्नावर जागतिक शांतिची प्रस्थापना कशी अवलंबून आहे हें सांगितलें आहे. गेल्या महायुद्धांत

विविधप्रकारची कशी व किती हानि झाली याचा समग्र हिशोबच उद्धृत केला आहे. या सर्व आपत्तींतून सार्वत्रिकसुखाचा असा एक मार्ग त्यांनीं दाखविला आहे व तो ह्मणजे जगद्राष्ट्र-स्थापना. सद्यःकालीं या ध्येयानें प्रेरित झालेल्या कांहीं संस्था कार्यही करीत आहेत व यावरू-नच असें वाटूं लागतें कीं या सर्वांच्या प्रयत्नाचें परिणत स्वरूप आप-णाला जगद्राष्ट्र-स्थापनेंत दिसून येईल. अर्थात् या जगद्राष्ट्रांत प्रत्येक राष्ट्रानें आपण एका मानवी कुटुंबांतील मंडळी आहोत या वृत्तीनें राहिलें पाहिजे, तरच हें कार्य यशस्वी होऊं शकेल.

आता जगद्राष्ट्र-स्थापनेच्या विचाराची कांहीं लोक काल्पनिक ध्येय, स्वप्नसृष्टींतील मनोराज्य, अव्यवहार्य कल्पना व निसर्गविरोधी योजना इत्यादि विविध प्रकारें अवहेलना करतात. या बाबतींत ते एकाच दृष्टीनें विचार करीत असावेत असें वाटतें. ज्याअर्थीं आधुनिक मानव जगभर साम्राज्यसत्तेचें जाळें पसरवूं शकतो, जसा तो आपल्या इतर बांधवांचा भयंकर विज्ञानाच्या सहाय्यानें निःपात करूं शकतो, याचप्रकारें हें जागतिक कल्याणाचें व सार्वत्रिक सुखाचें कार्य त्याच्या हातून घडूं नये किंवा त्यानें त्या दिशेनें कार्यास प्रारंभही करूं नये ही खरोखरीच सखेदाश्चर्यकारक गोष्ट आहे. मानवी जीवनाच्या इतर कार्यक्षेत्रांत जी मानवी शक्ती प्रभावी व प्रभुत्व गाजविणारी ठरूं शकते तीच या सर्वसुखाच्या राजमार्गाचा अवलंब करण्याच्या बाबतींत मात्र सामर्थ्यहीन ठरावी हेही आश्चर्यच होय. अर्थात् याचा दोष आपण मानवाच्या मनोरचनेला, मानवी निसर्गधर्मच मुळीं स्पर्धाशील असा आहे, स्वामित्वाची त्याला भूक आहे इत्यादि गोष्टी सांगून दोष देऊं. परंतु यावर असा प्रश्न उद्भवतो कीं, जो मानवप्राणी एकटांच असूनही

सर्वंच राष्ट्रच्या राष्ट्र आपल्या जादूनें मारून टाकतो व या मानवी शक्तीचा उलट दिशेनें अपव्यय करू शकतो, तर हीच मानवीशक्ती, मानवी मनाच्या इतर सत्प्रवृत्तींना योग्य चालना देऊन वरील जागतिक कल्याणाचें परम मंगल कार्य तो करूं शकणार नाहीं कां? अलिकडे विज्ञानशास्त्राच्या इतर अंगोपांगाचा बहुविध प्रकारें विस्तार झाला आहे, परंतु याच विज्ञानशास्त्रानें मानवी मनोविज्ञानशास्त्रांत मात्र पराणतिच केली आहे असें ह्मणणें भाग पडतें. जे विज्ञानशास्त्र जीवनाच्या इतर कार्यक्षेत्रात अत्यंत प्रभावी व कुशल ठरतें तेंच विज्ञानशास्त्र वरील ध्येयाला अनुरूप व अनुकूल अशी अखिल मानवजातीची मनोभावना का करूं शकत नाहीं हें आधुनिक विज्ञानयुगातील एक अत्यत गूढ आहे. सर्वत्रानीं (ह्मणजे भारतीयानींच नव्हे, तर अखिल मानवजातीनें) मनात आणल्यास, व्यवहार्य होऊं शकणाऱ्या वरीलध्येयाला मूर्तस्वरूप प्राप्त करून देण्याचें प्रयत्न करावेत एवढीच कळकळीची विनंति आहे.

जाता जाता एका गोष्टीचा उल्लेख करणें आवश्यक आहे. प्रथम जेव्हा पाचसहा प्रकाशकाकडून निराशाजनक उत्तरें आलीं तेव्हां मात्र मनाचा विरस झाला; परंतु ही हकीकत लेखकाला कळविली व त्यानीं मात्र चांगलेंच उत्तेजन दिलें. त्यानीं जे लिहिलें ते त्यांच्या शब्दांत खालीं देत आहे. " Do not lose heart, but please go on trying. Some of the world's best books were refused by publishers at first, because they did not see any commercial gain in it. " अर्थात् प्रस्तुत पुस्तक जगन्मान्य होईल अशातली गोष्ट नाहीं. तरी परंतु यावरून एकंदर वस्तुस्थितीची चांगली ओळख होतें.

येथील राजस्थान मुद्रणालयाचे मालक **श्रीयुत कालूराम उपाध्याय** यांनीं पुस्तकमुद्रणाचें काम योग्य प्रकारें केलें याबद्दल मीं त्याचें मनःपूर्वक आभार मानतो. काहीं ठिकाणीं ' मुद्रा-राक्षस ' ( Printer's devils )-काहीं मुद्रणदोष राहून गेलें आहेत त्याबद्दल वाचक क्षमा करतील अशी आशा आहे.

शेवटीं प्रस्तुत अनुवादकाची ही वाङ्मयकृती म्हणजे महाराष्ट्र साहित्यसोपानाची पहिलीच पायरी असून, महाराष्ट्रशारदेच्या प्रासादा-तील पहिलेंच पाऊल आहे, तरी महाराष्ट्रीय वाचकवर्ग याची उपेक्षा न करतां योग्य ते उत्तेजन व प्रोत्साहन देईल अशी पूर्ण आशा आहे. तसें झाल्यास मराठी वाङ्मयाची आणखी काहीं सेवा करण्याचें आश्वासन देऊन वाचकाना लेखकाचा परिचय करून घेण्याची विनंति करितो. शेवटीं श्रीज्ञानेश्वराच्या शब्दात जागतिक कल्याणाचें मागणें मागून वाचकाची रजा घेतो.

दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥

गणेश चतुर्थी
शके १८६२
सप्टेंबर १९४०

अ. स. काशीकर.

*

# लेखकाचा परिचय

डॉ. गॅल्थेरम् एच्. मीज् यांचा जन्म १९०२ सालीं एका उच्च कुलामध्यें हॉलंडमधील रॉटरडॅम् येथें झाला. बालपणापासूनच यांचा पौर्वात्य राष्ट्रांकडे बराच ओढा आहे. यांनीं प्रथमतः व्यापारी शिक्षण घेतलें. या अभ्यासक्रमांत ते यशस्वी झाल्यावर यांनी मोठ्या आंतरराष्ट्रीय व्यापारी कंपनींत एक वर्ष काम केलें. नंतर त्यांनीं केंब्रिज विश्वविद्यालयांत अर्थशास्त्राच्या अभ्यासाकरतां प्रवेश केला व नंतर ते सेंट जॉन कॉलेजचे एक सभासद झालें. या परीक्षेंत ते १९२५ सालीं यशस्वी रीतीनें उत्तीर्ण झालें. यानंतर ते तेथेच इतर विविध विषयांचा अभ्यास करण्याकरतां एक वर्ष राहिलें व शेवटीं कायद्याच्या प्रवेश परीक्षेंत उत्तीर्ण झालें. मधल्या काळांत पौर्वात्याबद्दलची त्यांची आवड वृद्धिंगत होत गेली. व त्यायोगानें ते हिंदु तत्त्वज्ञानाचे उत्साही अभ्यासक बनलें. हॉलंडमधील लेडन ( *Leiden* ) विश्वविद्यालयांत जाऊन तेथें त्यांनीं सामाजिक, व शैक्षणिक शास्त्रांत प्राविण्य मिळविलें. नंतर त्यांना डॉक्टर ही पदवी मिळाली. या कालांतच त्यांनीं ' श्रीरामकृष्णाचा संदेश ' (*The Message of Shri Ramakrishna*), ' श्रीकृष्णाचा संदेश' (*The Message of Shri Krishna* ), ' नारदऋषींचा संदेश ' ( *The Message of Narada Rishi* ), इत्यादि धार्मिक व तत्त्वज्ञानात्मक पुस्तकें लिहिलीं.

नंतर ते हिंदु समाजशास्त्राचा सखोल अभ्यास करूं लागले. धर्माच्या विवेचनात्मक स्वरूपाचा व हिंदूंच्या प्राचीन वर्गरचनेचा, आधुनिक समाजघटनेचा, वर्णव्यवस्थेच्या अनुरोधानें त्यांनीं तुलनात्मक अभ्यास केला व अशारीतीनें १९३१ मध्ये त्यांनीं समाजशास्त्रावरील **'धर्म व समाज'** ( *Dharma and Society* ) हा निबंधात्मक ग्रंथ लिहून डॉक्टर पदवी संपादन केली.

त्यांनीं युरोपखंडांत सर्वत्र प्रवास करून पुष्कळ ठिकाणीं व्याख्यानें दिलीं. इंग्लिश व डच भाषेव्यतिरिक्त फ्रेंच व जर्मन भाषेवरही त्यांचें चांगलें प्रभुत्व असून, इतर भाषांचीही तोंड ओळख आहे. ते हिंदुस्थानांत प्रथमतः १९३५ च्या ऑक्टो-

बरमधें आलें व सिलोनमधें दोन महिने वास्तव्य केलें. तेव्हांपासून त्यांनीं हिंदुस्थानांत भारतीय जीवन, धर्म व शिक्षणपद्धति इत्यादि विविध विषयांचा अभ्यास करण्याच्या दृष्टीनें विश्वविद्यालयांना व इतर शिक्षणकेंद्रांना भेटीं देऊन व्याख्यानें देत देत बराच प्रवास केला. त्यांना त्रिणामलय येथील रमणमहर्षींबद्दल बराच आदर आहे व म्हणून त्यांच्या सहवासांत त्यांनीं बराच काल घालविला.

पुन्हां युरोपमधें चार महिने घालवून डॉक्टरसाहेब आपल्या मलबार किनाऱ्यावर **तुलनात्मक संस्कृति-अभ्यास-मंदिर** स्थापनेच्या योजनेला मूर्त स्वरूप देण्याकरतां हिंदुस्थानांत परत आले. संस्थेला ' धर्माश्रम ' असें नामाभिधान देण्यांत येईल.

या अभ्यास-मंदिरांत भारतीय आश्रमपद्धति व आधुनिक शास्त्रीय पद्धति यांचा सुंदर समन्वय करण्यांत येणार आहे. पौवात्य व पाश्चात्य संस्कृतींच्या परस्पर दळण-वळणामुळें उत्पन्न झालेले, बदलत्या काळांतील सामाजिक व मानसशास्त्रीय प्रश्नांचा सखोल अभ्यास हेंच या संस्थेचें प्रमुख ध्येय आहे. ही संस्था अंतरजातीय व अंतर-धर्मीय स्वरूपाची आहे. देशामधें व्यवहार्य अशी सांस्कृतिक पुनर्घटना घडवून आण-ण्यासाठीं योग्य अशी पुढारी माणसें निर्माण करणें हा या संस्थेचा मूळ उद्देश आहे. शेजारच्या खेड्यांतून ग्रामसुधारणेचें कार्य केलें जाईल तरी संस्थेचें ध्येय मात्र यापेक्षां विशाल स्वरूपाचें राहील. अभ्यासकाच्या मानसिक कलाप्रमाणें शिक्षण देण्यांत येईल. शिक्षणक्रमाच्या दोन शाखा आहेत. ( १. ) सुधारणेंतील संघटनात्मक प्रश्नांचा विचार करणारें समाजशास्त्र ***( Sociology, mainly concerned with the organisational problems of Civilisation. )***, व ( २ ) धर्म व संस्कृतिविषयक इतर प्रश्नांचा विचार करणारें मानसशास्त्र ***( Psychology, mainly concerned with the problems of Culture ).***

संस्कृत व इतर युरोपियन भाषासुद्धां शिकविल्या जातील. हें अभ्यास-मंदिर जीवनांत व अभ्यासांत भारतवर्ष व पाश्चात्य राष्ट्रें या उभयतामध्यें संघटन व ऐक्य घडवून आणणारी अशी एक मध्यवर्ती संस्था म्हणून कार्य करील. या योगानें डॉ. मीज् यांच्या आवडत्या ध्येयाला मूर्तस्वरूप प्राप्त होणार आहे.

---

# लेखकाची प्रस्तावना

आधुनिक जागतिक दुःस्थितीचें मूळ कारण एक मानवी संघ दुसऱ्या मानवी संघाला जीविताताील बराच भाग अपूर्ण आहे या कारणास्तव दोषास्पद ठरवूं लागला यांतच आहे. एक प्रजासंघ दुसऱ्या प्रजासंघाला आर्थिक व सामाजिक दोषाकरतां नांवें ठेवीत आहे. राष्ट्रेंही त्याच कारणाकरतां विशेषत: दुसऱ्याच्या दोषपूर्ण व घातकी राजकीय धोरणास्तव एकमेकांना नांवें ठेऊं लागली आहेत.

पौर्वात्य आणि पाश्चात्य देशांत वर्गद्वेषाचें व जातीय मत्सराचें विष मानवी समाज ज्या मूळावर अधिष्ठित आहे त्या मूळांत भिनलें जात असून, असत्प्रवृत्त राष्ट्रीयतेच्या ( Misguided Nationalism ) निनादांत जगांत चाललेलें शांतिपाठ मानवाच्या कर्णपथावर येणें अशक्य होत आहे. याचें मूळ कशांत आहे ? हिंदुस्थानांत तरी जातीय संघर्ष, जातिमत्सर, व धार्मिक तेढ हें राष्ट्रीय ऐक्याला विरोधक ठरत आहेत.

पाश्चात्य देशांत ' भांडवलशाही '( Capitalism ) व अल्पसंख्याक अधिकारशाही ( aristocracy ) आणि पौर्वात्य देशांत ' वर्णाश्रमधर्म ' व ' वर्णसंकर ' इत्यादि शब्दप्रयोग आनंद किंवा अभिमान आणि उपहास किंवा तिरस्कार या दोन मनोभावनेमधील नानाविध प्रकारचें विचारतरंग मानवी मानससरोवरांत उद्भूत करण्यास कारणीभूत होतात.

सुख व सोई या दृष्टीने आधुनिक मानव सुश आहे खरा. परंतु जेव्हां सामाजिक किंवा राजकीय प्रश्न उद्भवतात तेव्हां मात्र तो विकारवश होऊन विचार करण्यास असमर्थ बनतो. जर एखाद्या प्रसंगी एखाद्या मानवाकडून अन्यायाचें किंवा निर्दयतेचें वर्तन झालें तर तो त्या मानवाच्या कुटुंब, जात, राजकीयपक्ष, धर्म किंवा राष्ट्र देखील इत्यादि गोष्टीविषयीं उभयपक्षीं विचार न करतांच आपल्या मनांत दुष्टग्रह करून घेतो. पक्षाभिनिवेश हें डोळ्या

सारखें वेडें पीक आहे, कारण त्याचें एकाच्या अनुभवावरूनच बीजारोपण होतें व इतराच्या कल्पनाचातुर्यरूपी जलसिंचनानें तें वाढीस लागतें. हें सर्व मानवी समाजाच्या पद्धतशीर व सुसंघटित स्वरूपाविषयी अंतर्दृष्टीचा अभावच दर्शवितें.

पक्षाभिमानाचें भूत वाटेल त्या बाबतीत आपला नंगा नाच चालवितें. कारण सामाजिक संघ किंवा वर्ग, राष्ट्र, ज्ञातिव्यवस्था, विशिष्ट धर्म, कांही 'शाह्या' ( Isms ) इतकेंच नव्हे तर विशिष्ट शब्द व शब्दप्रयोग इत्यादि सर्व प्रांतांत त्याचा अनिर्बंध संचार चालू असतो व आहे यामुळें प्रत्येकाला आपापल्या दुरभिमानाचें फल भोगावें लागतेंच. तेव्हां जनतेला सामाजिक प्रश्नांचा विकाररहित मनानें व सर्वांगपरिपूर्ण दृष्टीनें म्हणजे शास्त्रीय दृष्टीनें विचार करण्याविषयीं आग्रहाची विनंति करणें अत्यंत आवश्यक आहे. विशेषत: हिंदुस्थानला तरी अशा प्रकारच्या विनंतिची अत्यंत आवश्यकता आहे कारण येथे नानातऱ्हेचें परंतु महत्वाचें सामाजिक प्रश्न उद्भवतात.

विरोधाला प्रवृत्त करणाऱ्या शब्दप्रयोगांचें परस्परविरोधी पक्षांच्या भावना संतुष्ट ठेवल्या जातील अशा पद्धतिने विवरण करणें शक्य नाहीं काय ? अर्थात् शक्य आहे परंतु केव्हा ? हे तेव्हांच शक्यकोटीत येईल जेव्हा प्रत्येक पक्ष किंवा प्रत्येक मानव आपल्या वैयक्तिक भावनांना थोडा वेळ बाजूला ठेऊन, त्याबद्दल आपण अगदीं प्रथमच विचार करीत आहोत अशा भावनेनें व आधुनिक समाजशास्त्राच्या पद्धतीनें व निःपक्षदृष्टीनें विचार करण्यास प्रवृत्त होईल. ज्याच्यापुढें आपण आपल्या वैयक्तिक व सामाजिक गोष्टीसुद्धां गौण समजतो अशा एका सत्याचीच त्याला कसोटी लावली पाहिजे कटु सत्यही आपणाला आपल्या विचारदृष्टींत किंवा कार्यपद्धतींत बदल घडवून आणण्यास शक्य होणार नाहीं, तरी पण सत्यापासून त्याच्या तेजानें डोळे दिपून जातील या भीतीनें ते लाथून न घेतां त्याच्याशीं दृष्टी मिळविण्याचें धैर्य आपणात असलें पाहिजे. सत्याशीं सामना करण्यास आपणास सामर्थ्य असलें पाहिजे, आणि मग त्याची काय आज्ञा आहे ती पाळून त्याप्रमाणें कृती करण्यास तत्पर असलें पाहिजे. या सत्याच्या शोधांत आपल्या मनाचा समतोलपणा नाहीसा होईल, मनाला चांचल्य येईल किंवा एकाद्या वेळेस आपणांवर कांहीं प्रसंगही येईल किंवा आपल्या क्याखालच्या धरणीचा आधारही सुटेल असाही प्रसंग येईल तरीपण आपण

सत्याची कास सोडली नाही तर सत्य आपल्या संरक्षणास धांवून येईल. कारण यच्चयावत् गोष्टींचें मूल तत्व सत्य आहे आणि त्यावरच सर्व अधिष्ठित झालें आहे ( सर्व सत्ये प्रतिष्ठितम् ) मानवी जीवनांतील अवशेष म्हणून जें कांहीं राहतें तें सत्यच राहतें. कारण ' सत्यमेव जयते ' हा त्रिकालाबाधित सिद्धांत आहे. सर्व रूढ कल्पनांचा, मानवनिर्मित आचारविचारांचा, धर्मभोळेपणाचा व अंध:श्रद्धेचा अज्ञानांध:कार सत्यरूपी सहस्ररश्मि सूर्याचा उदय झाल्याबरोबर नाहीसा होईल.

हें सर्व नाटकी भासतें व क्वचित् तसें असतेंही, परन्तु बहुतेक त्याचें स्वरूप विनोदीच असतें. मी विद्यार्थीदशेत असताना एका विद्वान् गृहस्थानें मला वारंवार आरशांत पाहा व स्वतांकडेच पाहून हंसत जा असें सांगितलें. मी त्याप्रमाणें वागलों व मला मी कांहीं तरी चांगलेंच केलें असें वाटूं लागलें. प्रथमत: मला तें जाचक वाटलें परंतु मग मात्र संवयीनें पडलें व त्यामुळें मला माझ्या स्वभावांतील द्वेष, अंधश्रद्धा, निरर्थक बढाई ( Vanities ) इत्यादि उपहासास्पद बाजू दिसूं लागली. याबद्दल आरशाला धन्यवाद दिले व हा शोध अपूर्व आहे असें वाटूं लागलें. आरशापुढून बाजूला झालों म्हणजे मला आपण आपल्या पूर्वदोषापासून अलिप्त होऊं लागलों असें वाटे. आपण स्वतःला कल्पनेच्या जोरावर जितके श्रेष्ठ समजतो तितके वास्तविक सत्याच्या कसोटीला उतरत नाहीं व यामुळें आपलें व्यंगचित्र आपल्या निदर्शनास येतें. परंतु वरील मार्गाच्या अवलंबनानें आपण हळुहळू सुधारूं लागतो व या योगानें आपलें व्यक्तित्व वैयक्तिक विचारांपासून व आंतरिक दोषांपासून अलिप्त होऊन पवित्र बनतें.

हीच वरील गोष्ट मीं अन्तर्दृष्टीनें करूं लागलों. सत्याच्या दर्पणासमोर मीं माझ्या वैयक्तिक जीवनाला उभें केलें. एवढेंच नव्हे तर माझ्या आवडीच्या इतर गोष्टी उदाहरणत: इतर लोक, मानवी शोध व मानवी संस्था आणि इतर मानवनिर्मित गोष्टी या सर्वांना त्या सत्यरूपी दर्पणासमोर उभें केलें. हें जेव्हां आपण करतो तेव्हां त्याचा परिणाम आनंदपर्यवसायी व दु:खपर्यवसायी असा दोन्हीप्रकारचा होतो. पोकळ डौल, स्वार्थदृष्टी, परमतासहिष्णुता व धर्मवेडेपणा इत्यादिकांच्या बंधनामुळें उत्पन्न झालेलें दु:ख आपल्या दृष्टोत्पत्तीस येतें. त्याच्याच

बरोबर उपहासही असतोच, कारण आपल्या अज्ञानाबद्दल व दोषाबद्दल जणूं काय अंतस्थ मानव ( Inner Man ) तिरस्कारयुक्त हास्य करीत आहे असें वाटतें. हा उपहास म्हणजे एक जीवनांतील अमोल देणगीच होय, कारण त्या योगानें जीवन हलकें होतें. या विकट हास्यांत वैयक्तिक बाजूं नसतें कारण तें हास्य अंतिम अवस्थेंत विधायक व जीवनप्रद ठरतें. तर आपण सत्याशीं सामना करून जीवनांतील दुःखवृक्षाला समूळ उपटून टाकून जीवन आनंदप्रद केलें पाहिजे.

हिंदुसमाजाचा व पाश्चात्य समाजव्यवस्थेचा तात्विक ( Theoretical ), आदर्शात्मक ( ideal ), व वास्तविक ( actual ) इत्यादि दृष्टीनीं तौलनिक अभ्यास केल्यास बरेंच मनोरंजक सिद्धांत निदर्शनास येतात. प्रस्तुत पुस्तकांत मी विचाराला व अभ्यासाला चालना मिळावी या हेतुनें विशेष खोल तात्विक विवेचनात न शिरतां सोप्या भाषेंतच विषयाचें प्रतिपादन केलें आहे, व तात्विक सिद्धांताकरतां व इतर प्रमेयाकरतां ' धर्म व समाज ' ( Dharma and Society ) या माझ्या पुस्तकांतील संदर्भ दिलें आहेत ते चिकित्सक व अभ्यासू वाचकांनीं त्या पुस्तकात पहावेत

हिंदुस्थानांतील समाजजीवनविषयकच नव्हे तर पाश्चात्य जगांतील सामाजिक व राजकीय जीवनविषयक प्रश्नाबद्दलचें सिद्धांतही फारच आश्चर्यकारकरीतीनें प्रस्थापित होतात. प्राचीन हिंदुस्थानच्या समाजशास्त्राला आधुनिक विचारांची जोड मिळणें हीच जागतिकस्वरूपाचें सामाजिक व राजकीय प्रश्न सोडविण्याची गुरुकिल्ली होय. ( In fact, the social science of ancient India complemented by modern thought provides the key to the solution of various social and political world problems. ) हें सर्व विवेचन मानवानें नीट विचारांत घेऊन त्याचें आचारांत संक्रमण करणें यावरच याचें साफल्य अवलंबून राहील.

---

# अनुक्रमणिका

# — मानवी कुटुंब आणि हिंदुस्थान —

## प्रकरण पहिलें.

## प्राचीन हिंदुंचें सामाजिक सिद्धांत व आधुनिक समाजशास्त्र.

जातिव्यवस्थेचें समाजविरोधी म्हणून खंडन व अत्यंत उच्च प्रतीची मानवी संस्था म्हणून मंडन हें एकाच वेळीं होणें कसें शक्य आहे ? भारतीय सामाजिक प्रश्नांच्या अभ्यासकाला जातिव्यवस्थेविषयक मतमतातरांतील वैविध्य व विरोव पाहून कितीदां तरी आश्चर्य वाटलें असेल. ज्या अर्थीं दोन्ही पक्षाची मतें अत्यंत प्रामाणिक व विद्वान् लोकांकडून माडली जातात, त्या अर्थीं त्याचा एक अर्थ होऊं शकेल. तो असा कीं, या विषयावरील अनेक लेखक त्या शब्दांचें विविध अर्थ गृहीत धरून त्याचें प्रतिपादन करतात. सनातनी पंडित, इतिहासकार तत्वज्ञानी व आधुनिक सुधारक इत्यादि लोक आपापली विशिष्ट परि-

भाषा वापरतात व ते परस्पराना समजूं शकत नाहींत. कांहीं विद्वान जाति व्यवस्थेला एक सामाजिक सिद्धांत मानतात, काही सामाजिक आदर्श समजतात, कांहीं विशिष्ट ऐतिहासिक कालांतील सामाजिक आचार असें मानतात व कांहीं तिला सद्यःकालीन सामाजिक घटना असें प्रतिपादन करतात.

कोणत्याही प्रश्नाचा विचार करताना उपरिनिर्दिष्ट दृष्टिकोन निष्काळजीपणानें किंवा अज्ञानानें उत्पन्न झालेल्या द्वेषमूलक भावनेमुळे उपेक्षणीय ठरत नाहींत. या घोटाळयाचें मुख्य कारण ह्मणजे विशिष्ट अर्थानें वापरलेलें विशिष्ट शब्द प्रयोग हें होय. या करता आपण वर्ण हा शब्द सामाजिक सिद्धात किंवा आदर्श आणि जाति हा शब्द सामाजिक आचार या अर्थानें वापरू, परंतु या दोन्हींतही बराच विरोध आहे. वास्तविक सत्य काय आहे, तें कसें असावयाला पाहिजे होतें, आपणाला तें कसें असावें असें वाटते, आपण त्याबद्दल कसा विचार करतो आणि तें कसें असावें याबद्दलचा आपला विचार इत्यादि गोष्टीं-तील भेद आपणाला प्रत्येक सामाजिक प्रश्नाचा विचार करताना स्पष्ट समजून घेणें आवश्यक आहे. कारण निरनिराळ्या शास्त्रांच्या अभ्यासू वर्गांत समजुतीच्या घोटाळ्याचे व वितंड वादाचें कारण वरील पांच प्रकारातील घोटाळा हेंच होय.

समाजशास्त्र हें तंतोतंत बरोबर असें शास्त्र नाहीं. कारण वास्त-विक सत्य व कोणत्याही प्रश्नाची कार्यकारण परंपरा पूर्णतेनें आपणाला कधींच अवगत होत नाहीं. इतिहास व वर्णनात्मक समाजशास्त्र थोडीशी बाजू निदर्शनास आणून देतात. सत्य कसें असावयास पाहिजे होतें

याबद्दल आपणास पूर्णपणें विचार प्रदर्शन करतां येत नाहीं. इतर गोष्टी आपणाला कशा असाव्या असें वाटणें शास्त्रीय दृष्ट्या योग्य ठरत नाहीं. यामुळें आपणाला आपल्या सभोंवतील गोष्टी कशा वाटतात व त्या कशा असाव्या असें वाटतें यावरच भर देणें आवश्यक ठरतें.

कोणत्याही पूर्ण शास्त्रापेक्षां समाजशास्त्रात सामाजिक प्रश्नांचें महत्व व परिस्थितीचा पेच हें ओळखूनच विशेष दक्षता बाळगणें आवश्यक आहे. याकरतांच जागतिक सहानुभूतियुक्त उच्च उद्देश, आणि निःपक्षपाती, गुणदोषविवेचक, तीक्ष्ण सूक्ष्मदृष्टी, या गुणांची अत्यंत आवश्यकता लागते.

चातुर्वर्ण्याचें तत्व प्राचीनकालीं फक्त हिंदु समाजालाच लागू होते असें नाहीं. सामाजिक जीवनाचें प्रश्न सोडविणारा प्राचीन ऋषि वर्ग आपण आतां समजतो त्यापेक्षा फार बुद्धिमान् होता. प्राचीन हिंदुचें सिद्धांत व आदर्श वर्गव्यवस्था यांचा सूक्ष्म अभ्यास केल्यानंतर मला असें वाटतें कीं, चातुर्वर्ण्य व्यवस्था जागतिक आदर्श वर्गव्यवस्था होण्याच्या योग्यतेची आहे आणि प्राचीन ऋषींचाही हाच दृष्टिकोन होता. जगांतील सर्व खंडाचें व त्यातील लोकांचें ज्यात वर्णन आहे अशा पुष्कळशा पुराणात असें स्पष्ट ह्मटलें आहे कीं, हिंदुस्थानप्रमाणेंच त्या लोकातही चातुर्वर्ण्य व्यवस्था होती व आहे. याप्रमाणेंच सर्वव्यापकत्वाची छाप आपणाला भगवत् गीतेंत व भागवतांतही दिसून येतें. उदाहरणार्थः—वाचकांनीं भगवद्गीतेंतील १८ व्या अध्यायातील ४१ ते ७१ श्लोक पहावेत. तसेंच भागवतातील स्कंध ७ मधील दुसरा अध्यायही पहावा. इतर लेखकही चातुर्वर्ण्य व्यवस्थेच्या व्यापकत्वाची

साक्ष पटवून देतात. उदाहरणार्थ डॉ. केतकराची मजल तर येथपर्यंत गेली आहे कीं ते ह्मणतात की 'हिंदुधर्म' असा नव्हताच तर तो 'मानवधर्म'÷ च होता. 'वर्ण आणि धर्म' सर्वव्यापक तत्वें आहेत व हें हिंदुंचें शोध आहेत, नवीन कल्पना नव्हेत. दोन्ही कल्पनांचा भिन्न विचार करणें शक्य नाहीं. पुष्कळ प्राचीन राष्ट्रांना धर्म हा त्याच्या प्रधान स्वरूपांत अवगत होता. यहुदी लोक सेडका ( Tsedaka ), ग्रीक लोक डाईक ( Dike ), रोमन लोक फॉस ( Fas ), व चीनी लोक तेह ( Teh ) या स्वरूपांत धर्म ओळखत होते.

हिंदुधर्मालाही आंग्लधर्म व चीनी धर्माप्रमाणें स्थान देणें आवश्यक आहे. हिंदुधर्म नुसता जागतिक धर्मच नव्हे, किंवा तो हिंदुंचा सामान्य कायदा किंवा रूढी नव्हे तर ती जागतिक परस्परसंबंध विषयक पद्धतशीर अशी हिंदुत्वाची जागतिक संस्कृतिला दिलेली एक अमोल देणगी आहे.

हिंदुधर्माकडे अंतरराष्ट्रीय दृष्ट्याच पाहावयाला पाहीजे. कारण हिंदुस्थानांतील हिंदुना मानवधर्मच अभिप्रेत आहे व याप्रमाणेंच इंग्लंडमधील इंग्लिशांना व चीनमधील चीनी लोकाना तोच अर्थ अभिप्रेत आहे.

वर्णव्यवस्थेचा जागतिक दृष्टया विचार करूं लागल्यास असा चमत्कार निदर्शनास येतो कीं अधिकारपरत्वें ( Hierarchical ) पाडलेलें चार विभाग आपणाला सर्वत्र आढळतात. (१) मजूरवर्ग, (२) मध्यमवर्ग, (३) वरिष्ठवर्ग – ज्यात शासनसंस्थेचा नोकरवर्ग व

---

÷ श्री. व्यं. केतकर कृत "An Essay on Hinduism"

भांडवलवाला धंदेवाईक वर्ग आणि शिक्षण संस्थेंतील नौकरवर्ग व उपाध्यायवर्ग यांचा अंतर्भाव होतो, अशा चार प्रकारचें वर्गीकरण प्राचीन व अर्वाचीन संस्कृतिमध्यें आपल्या दृष्टोत्पत्तीस येतें. सोव्हियट रशियामध्येंही चारवर्ग मानलें आहेत. (१) शेतकरी, (२) शिपाई, (३) बुद्धिजीवी व (४) श्रमजीवि. यावरून वर्गविषयक बहुतेक सिद्धांत मानवी समाजात चार वर्गांचें अस्तित्व प्रतिपादन करतात.

प्राचीन इराणी समाजांतही प्राचीन हिंदुप्रमाणेंच चारवर्ग होतें. इतर पुष्कळशा प्राचीन संस्कृतिमध्येंही समाजाचें चतुर्वर्गीय वर्गीकरण होतें. हिंदुच्या वर्गव्यवस्थे शिवाय प्लेटो व ॲरिस्टॉटल यांनी प्रतिपादन केलेल्या महत्वाच्या वर्गव्यवस्थेचा उल्लेख करणें आवश्यक आहे. (याचा विचार शेवटीं होणार आहे.) प्लेटोनें राष्ट्राची (State) तुलना मानवी आत्म्याशीं केली तर ॲरिस्टॉटलनें विशेष योग्य रीतीनें राष्ट्राची तुलना मानवी देहाशीं केली आहे. हें समाजाचें सेंद्रिय चित्र होय. (This is the organic picture of society) (याचा विचार पुढे येणार आहे.) दोघाहीं तत्ववेत्त्यांनीं मूलभूत चार वर्ग मानलें आहेत. केव्हां केव्हां पाचही कल्पिलें आहेत परंतु त्यांत शेवटचें दोनें एकाच वर्गांत येऊ शकतात.

हिंदुच्या शिकवणुकीनें किंवा प्लेटो व ॲरिस्टॉटल यांच्या अभ्यासानें किंवा दोघाचाही परिणाम झाल्यानें आपल्या ऐने-अकबरीच्या प्रस्तावनेंत अबुल फजलनें समाजाचें चारच वर्ग कल्पिलें आहेत. ब्लॉचमनच्या भाषांतराचा उतारा देणें आवश्यक वाटतें म्हणून तो पुढें देत आहे.

"By means of the warmth of the ray of unanimity and concord, a multitude of people become fused into one body, and the people of the world may be divided into four classes;–(1) **Warriors**, who in the political body have the nature of fire. Their flames, directed by understanding, consume the straw and rubbish of rebellion and strife, but kindle also the lamp of rest in this world of disturbances. (2) **Artificers and Merchants**, who hold the place of air. From their labours and travels, God's gifts become universal and the breeze of contentment nourishes the rose tree of life. (3) **The Learned**, such as the philosopher, the physician, the arithmetician, the geometrician, the astronomer, who resemble water. From their pen and their wisdom a river rises in the drought of the world, and the garden of the creation receives a peculiar freshness from their irrigating powers. (4) **Husbandmen and Labourers**, who may be compared to earth. By their exertions, the staple of life is brought to perfection, and strength and happiness flow from their work. It is therefore obligatory for a king to put each of these in its proper place, and by uniting personal ability with a due respect for others, to cause the world to flourish. The grand political body maintains its equilibrium by the above four ranks of men."

भावार्थः– “ ऐक्याच्या भावनेनें अनेक जन समुदाय एकत्रित होतात व त्याचें चार वर्गांत वर्गीकरण करता येतें.

(१) **योद्धे किंवा क्षत्रिय वर्गः**– हा वर्ग राज्यसंस्थेंत अग्नि-सारखा असतो. बुद्धिच्या प्रेरणेनें प्रेरित होऊन त्याच्या ज्वाला अंतः-कलह व बंडाळी इत्यादि सारख्या तृणवत् कचऱ्याला दग्ध करतात परतु त्याबरोबरच या चळवळया जगात शातिचा दीपस्तंभही उभारतात.

(२) **कारागिर व व्यापारी वर्गः**– हा वायु सारखा असतो याच्या श्रमाच्या योगानें व प्रवास पर्यटनानें ईश्वरी देणग्यांचा सर्वत्र प्रसार होतो व याप्रमाणें समाधानाच्या वायुलहरीनें जीवितरूपी गुलाबाचें रोप वाढीस लागतें.

(३) **बुद्धिजीवी वर्गः**– यात तत्वज्ञ, वैज्ञानिक, वैद्यवर्ग, गणिती, भूमितीशास्त्रज्ञ, ज्योतिषी या सर्वांचा समावेश होतो व हा वर्ग जलसारखा असतो. या अज्ञानरूपी अवर्षणयुक्त जगांत त्याच्या लेख-णीपासून व बुद्धिपासून ज्ञानगंगा उगम पावतें आणि सृष्टीच्या उद्या-नाला त्याच्या विविध ज्ञानधारानें विशेष तजेला व शोभा येतें.

(४) **शेतकरी व कामकरी वर्गः**– हा पृथ्वीसारखा होय. त्यांच्या श्रमाच्या योगानें जीवनाला पोषक असणाऱ्या घटक द्रव्याचें उत्तम प्रकारें उत्पादन होतें व देशात सुख समृद्धिची व सामर्थ्यांची उत्त-रोत्तर वाढ होतें तेव्हा या चारी वर्गांची आपापल्या योग्यस्थळीं योजना करणें व आपलें व्यक्तिमत्व व इतराविषयीं आदरबुद्धि याच्या जोरावर राष्ट्राचा उत्तरोत्तर उत्कर्ष साधणें हें राजाचें प्रमुख कर्तव्य होय. कोण-त्याही राष्ट्राची शासनसंस्था राष्ट्रातील समतेचें संरक्षण या चार वर्गांच्या सहाय्यानेंच करतें.”

हें वर्णन नुसतें काव्यमय व सुंदर आहे असें नव्हे तर तें शास्त्रशुद्धही आहे आणि चातुर्वर्ण्याच्या सिद्धाताशीं जुळण्यासारखें आहे. फरक एवढाच कीं, याच्यांत धार्मिक वर्णानुक्रम पाळला गेला नाहीं.

एका शतकापूर्वीं अॅडम म्यूलर (Adam Mueller) या जर्मन लेखकानें सुद्धां धार्मिक पायावर आधारलेल्या अशा चातुर्वर्ण्याचेंच तत्व प्रतिपादन केलें होतें. त्यानें मांडलेले चार वर्ग खालीलप्रमाणें होते (१) उपाध्याय वर्ग व अध्यापक वर्ग, (२) जमिनदार व सैनिक वर्ग असलेला असा सरदार वर्ग, (३) धंद्यात, व्यापारांत, किंवा परस्पर देशांच्या दळणवळणांत भाग घेणारा एक वर्ग, आणि (४) उत्पादन क्रियेंत गुंतलेला श्रमजीवी वर्ग. त्यानीं या चारी वर्गांना जर्मन भाषेंत विशिष्ट नावें दिलीं आहेत. " He called them in German, perhaps to remember them more easily, in a playful impulse : Lehrstand, Wehrstand, Verkehrstand and Naehrstand. " यातील स्टॅंड याचा अर्थ वर्ग असा आहे. या अभ्यासकाच्या कर्णपथावर वर्णाचें नाव सुद्धां गेलें नसेल परंतु त्यानें जे वर्ग ठरविलें तें मात्र समाजाच्या निरीक्षणानेंच.

या चार वर्गांतच सर्व समाजातील निरनिराळ्या लोकसमुदायांचे वर्गीकरण होतें. मानवाचे ज्याच्या त्याच्या धर्माप्रमाणें प्रमुख चार भेद पडतात. आपण याचें सूक्ष्मावलोकन केलें तर आपणांस असें आढळेल कीं, या प्रत्येक वर्गांत त्या वर्गाचें जें कार्य ते करण्यास आवश्यक अशा तज्ज्ञ लोकांचाच समावेश असतो. ते असेः—

(१) उत्पादन कार्य करणारा वर्ग—शेतात, खाणींत, कारखान्यांत, हस्तकलेत व गृहव्यवस्थेंत काम करणारा वर्ग. (२) विभागणीचें कार्य करणारा वर्ग—धंदा, उदीम-व्यापार, व इतर दळणवळणाचे काम करणारा वर्ग. (३) शासकवर्ग—कायदेपंडित व कार्यकारी मंडळाचे सभासद याचा यांत समावेश होतो. (४) अध्यापक वर्ग-यांत विद्यार्थी वर्गाचा मनोविकास करणारा शिक्षकवर्ग, सत्याचें उपासक, उच्च दर्जाचें वैज्ञानिक व योगी किंवा गूढविद्याभ्यासक यांचा समावेश होतो. या वर्गांत शिक्षक, धर्मोपदेशक, तत्वज्ञानी, वैज्ञानिक, वैद्य, मनोविश्लेषणशास्त्रज्ञ, न्यायाधीश इत्यादि लोकांचा समावेश होतो. खरा कलावन्तही यातच येतो कारण तो जी कलाकृती निर्माण करतो ती आंतरिक स्फूर्तिनें व मानसिक गरजेकरतां निर्माण करीत असतो, मागणीचा पुरवठा करण्याकरतां म्हणून निर्माण करीत नसतो. ( The true artist also belongs to this group, for he creates out of inspiration and inner necessity, and not to supply a demand. ) तेव्हां ते चारवर्ग असे:—( १ ) उत्पादकवर्ग, (२) विभाजक वर्ग, (३) शासकवर्ग, आणि (४) बुद्धिजीवी—अध्यात्मवादीवर्ग. या चार वर्गांची तुलना चार वर्णांशीं केली तर ते बहुतेक समानच ठरतात.

या उपरिनिर्दिष्ट चार वर्गांचें परस्पर वर्गाविषयींचें प्रमुख कार्य कोणतें ? ते कार्य ह्मणजे सेवा. प्रत्येक वर्ग समाजाची यथाशक्ति सेवा करीत असतो.‘ परस्परं भावयन्तः ’ हेंच तत्व संस्कृतिचें मूळाशीं आहे. ( Civilisation is founded upon mutual service. ) किंवा मानवी धर्माचें प्रमुख कर्तव्य ह्मणजे परस्परसेवा हें आहे. सेवा

ह्मणजे स्वतांच्या धर्माचें आचारपालन. एक वर्ग आपल्या श्रमानें सेवा करतो तर दुसरा आपल्या बुद्धीनें. सर्व सेवा होती ती एकाच इंद्रिया-कडून व तें ह्मणजे अंतःकरण. सर्वजण सेवा अंतःकरणपूर्वकच करतात.

आपण आतां समाजघटनेचें सेंद्रियस्वरूपापर्यंत येऊन पोहो-चलों. मानवी समाजाची मानवी देहाशीं तुलना करता येईल. प्रत्येक वर्ण हा समाजपुरुषाच्या शरीरयष्टींतील एक इद्रियच आहे व प्रत्येक व्यक्ति त्या इंद्रियातील सूक्ष्मतंतु प्रमाणें आहे. इद्रियांतील प्रत्येक सूक्ष्म तंतु आपलें कार्य करून शरीराच्या सुस्थितीला सहाय्य करतो. जर तंतुमध्यें कांहीं बिघाड झाला तर त्यायोगें फोड वगैरे होतात व त्यानें इंद्रियाला दुःख होऊन शेवटीं शरीराला दुःख होतें. जर एखादें इंद्रिय आपलें कार्य स्वतंत्रपणें आपल्याच फायद्याकरतां करूं लागलें तर तें शरीराला एखाद्या व्रणाप्रमाणें त्रासदायक होऊन शेवटीं नाशास कारणी-भूत होतें. जगाच्या इतिहासांवरून आपणांस असें आढळतें कीं, कित्येक कालखंडात एखादा वर्ग वरील बेंडाप्रमाणें जाचक होऊन संस्कृतिच्या अवनतिस व केंव्हा केंव्हा तिच्या प्रगतिपथातील धोंड होऊन प्रगतीस बाधक ठरलेला आहे. अन्य वर्गाची पिळगूक करणारा शासकवर्ग असो किंवा मजूर वर्गाच्या श्रेणीला इतर सर्व मानवाना बसवू पाहणारा श्रमजी वीवर्ग असो—दोघेही दोषी ठरतात. कारण, आपल्या वर्गाच्या विवक्षित कार्यक्षेत्रातील कामगिरी इतर वर्गांच्या सुसंबद्ध सहकार्याच्या सहाय्यानें करणाऱ्या चार वर्गांचाच सामान्यतः सुसंघटित समाजांत अतर्भाव असतो. पायानें कोणी विचार करीत नाहीं किंवा कानानें कोणी बोलत नाहीं. उदर हें कांहीं सर्वसंग्रह करणारे गृह नव्हे व जर त्यानें तसें

स्वरूप धारण केलें तर शरीराच्या नाशास कारणीभूत होईल. हेंच तत्त्व समाजाला लागूं आहे.

अंतःकरण हेंच सर्वव्यापी इंद्रिय आहे कारण ते सर्व इंद्रियांना घटकद्रव्य पुरवितें व परस्परांचें संबंध कायम टिकवितें. अंतःकरण सर्व इंद्रियांची समता मानते व हात, पाय, मस्तक या सर्वांना सारखेंच रक्त पोहोचवितें. अंतःकरण भेदाभेद करीत नाहीं; याच कारणास्तव त्याला अध्यात्मिकतेचें व मानव्याचें केंद्र असलेल्या अशा हृत्कमलाचें स्थान प्राप्त झालें आहे.

वरील विवेचन एक महत्वाचा सिद्धांत प्रस्थापित करतें. सर्व-साधारणतः शरीरात इंद्रियांची व्यवस्था त्यांच्या अधिकारपरत्वेंच केलेली असतें. तसेंच सामाजिक दृष्टयाही समाजातील चारी वर्णांची व्यवस्थाही शरीराप्रमाणेंच अधिकारपरत्वें केलेली आहे. यावरून हें सिद्ध होतें कीं, सामाजिक विषमता कायमचीच आहे आणि मानवी समतेचें ध्येय सामाजिक दृष्टया अशक्य आहे. प्रत्येक इंद्रिय पोट किंवा प्रत्येक इंद्रिय मेंदू असलेल्या शरीराप्रमाणेंच सामाजिक समता असलेला समाज अशक्य कोटींतील आहे.

मानवी समता हें हृदयाचें कार्य होय. मानसिक दृष्टया सर्व मानव समानच असतात. सर्वांच्या आत्म्यांत भेद नसतो. लोकशाही हें प्रमुखतः एक गूढ ध्येय आहे. वर्गांच्या स्वार्थी चळवळीपूर्वीं व जन-समूहाच्या चळवळीची दोघी बाजू पुढें येण्यापूर्वीं मानवी समतेच्या ध्येयानें प्रेरित होऊन निघालेल्या सर्व चळवळींचें मूलस्थान अंतःकरणच होतें. राजकीय चळवळीप्रमाणेंच याही केव्हां केव्हां निष्फळ ठरल्या व

बौद्धिक चळवळीप्रमाणें दोन्हीही ठरल्या. आधुनिक मानवानें हा महत्वाचा मुद्दा अवश्य लक्षांत ठेवावा. समतेच्या व विषमतेच्या प्रश्नाबाबत लोकांमध्यें अद्यापही बराच घोटाळा आहे; मानवाची सामाजिक सेंद्रिय विषमता व अध्यात्मिक समता यातील भेद त्यांनी समजून घेणें आवश्यक आहे.

विषमता हा समाजाचा सामान्य नियमच आहे. (Inequality is the law of Society.) " कार्याप्रमाणें वेतन हा सामाजिक निर्बंध आहे; वैयक्तिक गुणावरच व त्यांनीं करावयाचें कार्यावरूनच विषमता ठरविली जाते. "

याप्रमाणें प्रत्येक व्यक्तिला संधिस्वातंत्र्य दिलें जावें, परतु जीवनाच्या प्रथमावस्थेंत मर्यादित स्वरूपाचे असावे हे जातिच्या दृष्टीनें व व्यक्तिच्या दृष्टीनेंही हितकारकच ठरतें. कारण कीं, या योगानें प्रत्येक व्यक्तिचा आपल्या मनाच्या कलानुसार व बौद्धिक शक्तिनुसार विकास होईल किंवा दुसऱ्या शब्दांत ह्मटलें ह्मणजे त्याचें समाजातील स्थान त्याच्या वर्णावरूनच ठरविण्यात येईल.

हिंदुत्वातही सामाजिक विषमता व अध्यात्मिक समता याबद्दल घोटाळा आहे; अध्यात्मिक समता विशेषतः अस्पृश्यतेच्या बाबतींत हिंदुत्वाच्या आचार धर्मांत पाहिजे तशी प्रत्ययास येत नाहीं. तत्वज्ञान विषयक ग्रंथांत व धर्मशास्त्रात मात्र मानवाची अध्यात्मिक समता व स्त्री पुरुषांची समता याचें प्रतिपादन बरेंच आहे. जातिव्यवस्थेमुळें संधि-स्वातंत्र्याचें तत्त्व बरेंच लयास गेलें परंतु अलिकडे पाश्चात्य सामाजिक व राजकीय विचारसरणीच्या सहवासानें त्याचें थोडे फार पुनरुज्जीवन झालें आहे.

मानवाची सामाजिक विषमता व अध्यात्मिक समता यांतील भेद स्पष्ट करून मुसल्मानी धर्मानें दुसऱ्याला बरेंच महत्व दिलें आहे. हा त्याचा विशेष होय. एकादा राजपुत्र जर मशिदींत गेला तर तो एकाद्या झाडूवाल्याजवळ मांडीला मांडी लावून बसतो—भेद केला जात नाहीं. कुटुंबव्यवस्थेंत जरी मान्य झालें असलें तरी स्त्रियांची अध्यात्मिक व सामाजिक समता मात्र विशेष प्रत्ययास येत नाहीं. पहिल्या शतकात मानवांतील व स्त्रीपुरुषातील अध्यात्मिक समतेला उचलून धरणें व व्यक्तीचें वैशिष्टयावर जोर देणें हा ख्रिस्तीधर्माचा मोठा गुण होता. आताही हा गुण कायम आहे, परतु हिंदुस्थानात मात्र परंपराभिमानामुळें याचें काहीं चाललें नाहीं, व इकडील मंदिरात स्पृश्य व अस्पृश्य असा भेद करण्याचें चालूंच राहीलें. अमेरिकेंत काहीं ठिकाणीं गोरेलोक व काळे नीग्रोलोक यात भेद केला जातो. एकंदरींत सर्व धर्म—कोणत्या ना कोणत्या तरी दृष्टीनें अध्यात्मिक समतेला आचारस्वरूप देण्यात अयशस्वी ठरत आहेत व विशेषतः हिंदुधर्म. आतां त्रावणकोरच्या महाराजानीं अस्पृश्याकरतां मंदिरे खुली करून एक आशादायक व आनंददायक अशीं अल्पस्वरूपातील क्रान्ति घडवून आणली आहे. मात्र बुद्धधर्म फार थोड्याप्रमाणांत अयशस्वी ठरला आहे.

समाजांतील कोणत्याही एका विभागानें दुसऱ्या विभागाला कनिष्ट दर्जाचें समजू नये, हें तत्त्व सर्वसाधारण समाजाला हितावह आहे, व बंधुत्व स्थापनेस्तव चाललेल्या सर्व ध्येयात्मक चळवळी अत्यंत उपयुक्त आहेत. त्या उपयुक्त तोपर्यंतच ठरतात जोपर्यंत सामाजिक सेंद्रिय विषमतेचें तत्त्व आपल्या दृष्टिकोनांतून गेलें नसेल. ज्याप्रमाणें

शरीराच्या स्वास्थ्यास्तव अंतःकरण सर्व इंद्रियाना रक्ताचा पुरवठा करतें, त्याप्रमाणेंच बंधुत्वाची भावनाच ' सूत्रे मणिगणा इव ' या न्यायानें सूत्रवत् सर्व वर्गांना एकत्रित व सहकारी करून सार्वत्रिक सुखाकरता झटण्याला व कार्य करावयाला कारणीभूत होऊं शकतें.

समाजाचें सेंद्रिय चित्रण हें काहीं आधुनिक नव्हे. मागेंच ॲरिस्टॉटलनें मानवी शरीराशीं राष्ट्राची तुलना केल्याचा उल्लेख आला आहे. इ. स. च्या पहिल्या शतकातील ख्रिस्तीधर्मी तत्वज्ञानी लोकाची याबद्दलची एक गूढ कल्पना आहे. ती अशी कीं, जगद्रूपी ख्रिस्त हा एक भव्य असा दैवी मानव असून इतर सर्व मानव त्याचें निरनिराळें अवयवस्वरूपी आहेत. नव्या करारातील शेवटच्या नामविरहित अध्यायात आपणांला खालील वचनें आढळतात " ज्याच्या इंद्रियांची शक्ति असामान्य आहे अशा दैवीस्वरूपापासून प्रत्येकाचा जन्म असतो " ( He it is whose limbs ( Members ) make a Myriad of myriads of powers, each one of which comes from Him.. " ) पिस्टिस सोफिया नांवाच्या एका ग्रंथात असें झटलें आहे कीं, " आमच्याकडे या, कारण आपण सर्व एकाच देहाचें भाग आहोत व आपण एकच आहोत–" ( " Come unto us, for we are thy fellow-limbs. We are all one with thee " ) ओरिजेननें एका ठिकाणीं झटलें आहे कीं, " ज्याप्रमाणें आपलें शरीर निरनिराळ्या इंद्रियांनीं भूषित असून आत्म्याच्या सहाय्यानें एकस्वरूपी आहे, तद्वतच या विराट्स्वरूपी विश्वाला ईश्वररूपी आत्म्यानें एकस्वरूपी केलें आहे.—" ( " As our body while consisting of human members is yet held together

by one soul, so the universe is to be thought of as an immense living being which is held together by one soul, the power of the logos, God. " ) इंद्रसौट व झोहार या गूढवादी ( Cabalists ) पंथांच्या ग्रंथांतही विश्वस्वरूपी विराट् पुरुषाचें वर्णन बरेंच आढळतें. हिंदुधर्मांतील विराट् पुरुषाचें वर्णन तर सर्वश्रुतच आहे. भगवत् गीतेच्या अकराव्या अध्यायांत श्रीकृष्ण अर्जुनाला सांगतात कीं,

" इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।
मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि " ॥७॥ अ. ११.

व अर्जुन याला उत्तरादाखल ह्मणतो कीं,

" पश्यामि देवास्तव देव देहे । सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ॥
ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥
१५ । अ. ११

भागवत पुराणांतही याच प्रकारचा उल्लेख आढळतो. तो असा,

" यस्यावयव संस्थानैः कल्पितो लोकविस्तरः ।
तद्वै भगवतो रूपं विशुद्धं सत्वमूर्जितम् ॥३॥स्कं. १.अ.३

" त्या भगवत्स्वरूपाच्या अवयवरचनेवरूनच ह्या चतुर्दश भुवनात्मक ब्रह्मांडाची कल्पना केलेली आहे. तेंच भगवंताचें अत्यंत शुद्धसत्त्वाचें स्वरूप होय. " विराट् पुरुषाच्या कल्पनेनें सेंद्रिय समाजाचें चित्र स्पष्टपणें चित्रित केलें आहे. याचें अत्यंत प्राचीन स्वरूप ऋग्वेदांत सांपडतें:—

ॐ यत्पुरुषं व्यदधुः कतिधा व्यकल्पयन् ।
मुखं किमस्य कौ बाहु का ऊरू पादा उच्येते ॥

ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्बाहुराजन्यः कृतः ।
ऊरू तदस्य यत् वैश्यः पद्भ्याशूद्रो अजायत ॥

यापुढील सूक्तात याचें पुढें विशेष वर्णन नाहीं परतु विष्णु-पुराणात सविस्तर उल्लेख आला आहे. तो असाः—

" सत्याभिध्यायिनस्तस्य सिसृक्षो ब्रह्मणो जगत् ।
अजायन्त द्विजश्रेष्ठ सत्त्वोद्रिक्ता मुखात्प्रजाः ॥ ३ ॥
वक्षसो रजसोद्रिक्तास्तथाऽन्या ब्रह्मणोऽभवन् ।
रजसा तमसा चैव समुद्रिक्तास्तथोरुतः ॥ ४ ॥
पद्भ्यामस्याः प्रजा ब्रह्मा ससर्ज द्विजसत्तम ।
तमः प्रधानास्ताः सर्वाश्चातुर्वर्ण्यमिदं ततः ॥ ५ ॥
ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्राश्च द्विजसत्तम ।
पादोरुवक्षः स्थलतो मुखतश्च समुद्गताः ॥ ६ ॥
( वि. पु. १-६. ३-६. )

" परमात्म्याचें ध्यान करणारा तो ब्रह्मदेव जगत् उत्पन्न करण्याची इच्छा करीत असतां त्याच्या मुखापासून सत्त्वगुणप्रचुर अशी प्रजा उत्पन्न झाली. त्याचप्रमाणें ब्रह्मदेवाच्या वक्षःस्थलापासून रजोगुण प्रचुर व मांड्यापासून रजोगुण व तमोगुण या दोहोंनीं पूर्ण अशा प्रजा निर्माण झाल्या. नंतर ब्रह्मदेवानें आपल्या पायापासून काहीं लोक निर्माण केलें, ते सर्व तमोगुणपूर्ण होतें. या पूर्वीच्या प्रजा हेंच चार वर्ण होत. मुख, वक्षःस्थल, माड्या व पाय यापासून झालेल्या प्रजाच अनुक्रमें ब्राह्मण. क्षत्रिय. वैश्य व शूद्र होत. "

वरील वचनावरून असें दिसतें कीं, प्राचीन समाजशास्त्रज्ञ गुणस्वभावानुसारच वर्ण मानीत असत. गीतेंत ह्मटलें आहे कीं,

" चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्म विभागशः ॥
तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् " ॥अ.४-१३.

आणि अठराव्या अध्यायांतील पुढील चार श्लोकांत स्वभावजवृत्ति व तदनुसार त्यांचीं कर्तव्यें यांचें वर्णन आलें आहे. तें असें:—

" ब्राह्मण क्षत्रियविशां शूद्राणांच परतप ।
कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥
शमोदमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेवच ।
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥४२॥
शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।
दानमीश्वरभावश्च क्षात्र कर्म स्वभावजम् ॥४३॥
कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।
परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥४४॥

एकदरीत सामाजिक दृष्टयाच नव्हे तर भौगोलिक दृष्टयाही सांस्कृतिक व आर्थिक या अर्थानें जगाला एक जागतिक विराट्पुरुषच मानणें आवश्यक आहे. यानंतर प्रत्येक राष्ट्रातील श्रेष्ठ वर्णानें आपल्या बौद्धिक किंवा सांस्कृतिक कलाकृतींचा उपयोग जागतिक कल्याणा-करतांच केला पाहिजे; दुसऱ्या वर्णानें जगद्राष्ट्रनिर्मितीचे प्रयत्न करावेत आणि खालच्या दोन वर्णानें आपापल्याला स्वस्तदरांत उत्तम जे पिकवितां येईल किंवा इतर कांहीं उत्पादन करतां येईल तें करून जेथें ज्या मालाची आवश्यकता तेथें तो आपल्याला जो माल पाहिजे त्याच्या बदली

पाठवून द्यावा व याप्रमाणें जागतिक घडामोडीस सरळ व्यापाराचें स्वरूप आणावें. यावरून हें स्पष्ट होतें कीं, संपूर्ण अंतरराष्ट्रीयता ही चातुर्वर्ण्य व्यवस्थेप्रमाणेंच आहे व या तत्वानुसार जर परस्पर व्यवहार सुरळीत चालतील तर जागतिक कल्याणांतही बरीच भर पडूं शकेल.

जे आपल्या राष्ट्राच्या सरहद्दीच्या पलीकडे दृष्टी टाकीत नाहीं व जे सर्वदृष्ट्या स्वयंपूर्ण होऊं पाहतें असें संकुचित राष्ट्रीयत्व जागतिक दृष्ट्या विघातकच ठरतें. आर्थिक स्वयंपूर्णत्व व अलिप्तपणा हें अनैसर्गिक असून परिणामीं विघातक ठरतात. व्यापाराची व अंतरराष्ट्रीय दळण-वळणाची इतकी वाढ झाली आहे कीं आता जागतिक प्रश्न सोडविण्याची गुरुकिल्ली ह्मणजे जगद्राष्ट्रस्थापना हेंच होय. ' या नवीन राष्ट्रसंस्थेला स्वार्थी राष्ट्रीयत्वापासून व राष्ट्राच्या आक्रमक व जुलमी धोरणापासून रक्षण करण्याकरतां राजकीयदृष्ट्या काहीं संरक्षणाच्या मार्गाची योजना-करणें अत्यंत आवश्यक आहे. हें कार्य जगातील शासकवर्ग व कार्यकारी वर्गाचें आहे '—( Politically it will have to provide a safeguard against selfish nationalism and the aggressive or oppressive spirit of nations. This is the task of the ruling and regulating varna. ) आर्थिक दृष्ट्या तज्ञ व कुशल मजूर वर्गाच्या सहाय्यानें कमी किंमतींत उत्कृष्ट प्रतीचें जगांतील मालाचें उत्पादन व अंतरराष्ट्रीय व्यापाराचें योग्य दळणवळण यांचा मार्गदर्शक असा एक अंतरराष्ट्रीय संघ स्थापिला पाहिजे. दुसऱ्या व तिसऱ्या वर्णाच्या सहकार्यानें हें कार्य घडणारें आहे. ज्या क्षणीं काहीं राष्ट्रें जगद्रूपी शरीरांत फोडाप्रमाणें

त्रासदायक होतात, त्याचक्षणीं जागतिक आर्थिक पद्धतींत अनैसर्गिकता उत्पन्न होतें---( On the moment some nations have become as it were a kind of dangerous tumours in the world body, and the whole economic system seems to be becoming,more and more unnatural. ) जगांतील काहीं भागांत कांहीं पदार्थांचें अमर्याद उत्पादन होतें व ज्यास्त झालेल्या मालाचा नाश केला जातो व दुसरीकडे त्याच मालाचा तुटवडा पडतो व लोकांची त्या मालाची गरज भागत नाहीं. यावरून पूर्ण सहकार्यावर प्रस्थापित झालेलें एक मार्गदर्शक मध्यवर्ती केंद्र सद्यःकालीन जागतिक आर्थिक प्रश्न योग्यतऱ्हेनें सोडवूं शकेल. याचा विचार पुढें होईल. आतां आपण वर्ण व जाति यांतील भेद काय हें पाहूं.

वर्ण आणि जाति या परस्परविरोधी गोष्टीं आहेत. वर्ण हें निसर्गनिर्मित वर्ग आहेत, ते समाजघटनेंत स्पष्ट होत नाहीत, तरी परंतु ते सर्वसाधारणतः स्वाभाविक समाजरचना दर्शवितात. ते जरी फार थोड्यांनाच स्पष्टपणें कळत असलें तरी त्याचें अस्तित्व अमान्य करून चालणार नाहीं. समाजघटनेच्या दृष्टीनें पाहिलें तर समाजघटना या आदर्शानुरूपच झाली पाहीजे. वर्ण हा एक सांस्कृतिक दृष्ट्या कल्पिलेला वर्ग असें ह्मणण्यास हरकत नाहीं. चातुर्वेण्यव्यवस्थेचें तत्त्व समाजरचने विषयींच्या लोकाच्या विचारांना स्पष्ट करणारा असा एक सिद्धांत आहे, कारण तो स्वाभाविक किंवा सांस्कृतिक अधिकारपरत्त्वें ठरविलेला आहे. तेव्हा वर्णाकडे फक्त सामाजिक व शैक्षणिक दृष्ट्याच पाहिलें पाहिजे,

व त्याच दृष्टीनें तो महत्वाचा आहे. यामुळें लोकांना समाजरचनेचें चित्र स्पष्ट होतें; विशेषतः समाजघटना व अधिकारपरत्वे वर्णरचना आणि समाजरचना व सांस्कृतिक दृष्ट्या केलेली वर्णरचना यांतील भेद स्पष्ट होण्यास बरीच मदत होते. दुसरें असें कीं, समाजात आपलें स्थान कोणतें व आपलें समाजविषयक कर्तव्य कोणतें हें ठरविण्यास सुलभ जातें; आणि तिसरें असें कीं, त्याच्या विशिष्ट स्वभावानुसार विशिष्ट ध्येयानें ते प्रेरित होतात.

वर्ण हा शब्द आपण अत्यंत संकुचित व दुरभिमानी अर्थानें घेऊ नये. भविष्यकालात समाज कोणत्या थराला जाईल याचा अदाज करणें कांहीं अशक्य नाहीं व त्यावेळीं असें होणें शक्य आहे कीं, एक व्यक्ती सकाळीं विश्वविद्यालयीन प्राध्यापक ह्मणून शैक्षणिक वर्गात मोडली जाईल, तर दुपारी शेतकरी ह्मणून उत्पादक वर्गांत गणली जाईल. असें पाहिलें तर ती व्यक्ती दिवसांतून कितीदां तरी एका वर्णांतून दुसऱ्या वर्णांत जाईल असें सध्यांही आपण पाहतोच आहो. अशा स्थितींत उच्च वर्णाचीच गणना केली जाणार. प्राध्यापकाला शेतकरी होता येईल, पण शेतकऱ्याला मात्र प्राध्यापक होणें अशक्यच. शैक्षणिक योग्यतेवरूनच वर्ण ठरविला जातो, प्रासंगिक शरीरकष्टाच्या व्यवसायावरून नव्हे. याचप्रमाणें प्रत्येक पित्याला आपल्या मुलांच्या शिक्षणाच्या बाबतींत ब्राह्मण होण्याची संधि मिळतें व प्रत्येक मूल 'जन्मना जायते शूद्रः' असेंच समजलें जातें.

वर्णाची कल्पना लोकांचें अभेद्य तट पाडण्याकडे करतां कामा नये. वर्णाला दोन बाजू आहेत. समाजरचनेच्या तत्वाप्रमाणें ते अस्ति-

त्यांत असलेलें वर्ग दर्शवितात. सद्गृहस्थ हा कोठेंही सद्गृहस्थच समजला जाणार. स्वार्थसाधु हा स्वार्थसाधु ह्मणूनच गणला जाणार. प्रत्येक व्यक्तीला दुसऱ्या लोकाची उपयुक्तता व स्वभाव समजण्याइतकी बुद्धी असते. हें सर्व वर्ग या सदराखालीं येतें.

परंतु याप्रमाणें सर्वत्र सद्गृहस्थाना जाहीररीत्या सद्गृहस्थ ह्मणून समजण्यांत येत नाहीं किंवा त्याप्रमाणें त्याना दर्जाही पण मिळत नाही. त्याप्रमाणेंच आर्थिकदृष्ट्या, शारीरसंपत्तिच्या दृष्टीनें ह्मणा किंवा फसवणुकीनें ह्मणा काहीं लोक त्याच्या वास्तविक ठरलेल्या दर्जापेक्षां वरच्या दर्जांत गणलें जातात. याठिकाणी समाजघटनेचा आदर्श ह्मणूनच अधिकारपरत्वें वर्णरचनेचा संबंध येतो. समाजाचें खरे पुढारी समाजघटनेंत शक्य तोपर्यंत अधिकारपरत्वें वर्णरचना घडवून आणण्याचा प्रयत्न करीत असतात. तो कोणत्या मार्गानें ? जबरदस्ती, कायद्याच्या आश्रयानें किंवा समाजाचें बाह्य स्वरूपातील बदल इत्यादि मार्गांनीं नव्हे, तर शिक्षणानें, स्वतांच्या आचरणानें, अध्यात्मिकशक्तीनें, जनमताच्या पाठिंब्यानें किंवा समाजाचे मतपरिवर्तनानें इत्यादि मार्गांनीं तो प्रयत्न झाला पाहीजे. मग ती समाजघटना कोणतीही असो—पाश्चात्य देशात असल्याप्रमाणें ती आर्थिक पायावर उभारलेल्या वर्गपद्धतिची असो किंवा हिंदुस्थानांत असलेल्या जातिव्यवस्थेवर उभारलेली असो—त्याचा विचार विशेष महत्वाचा नाहीं. सामाजिक निर्बंध व सामाजिक गरजा ह्या विश्वव्यापक आहेत—( **Social laws and social needs are universal.** )

वर्ण व पाश्चात्य देशांतील वर्ग यांचा तौलनिक विचार पुढें करूं.

आतां हिंदुस्थानांतील प्राचीन वर्ण व वर्तमान जाति यांची तुलना करू व त्यांतील मुख्य भेदाची लक्षणें कोणती ती पाहूं.

जाति व वर्ण या विषयींच्या प्राचीन ग्रंथाच्या अभ्यासावरून असें दिसतें कीं, प्राचीनकालीं वर्ण वर्णामध्यें कृत्रिम बंधनाना बदी केली जात असें. महत्वाची बाब जर कोणती दर्शविली असेल तर ती म्हणजे ' वर्णसंकर ' ही होय. ( याचा विचार पुढील प्रकरणात केला आहे. ) स्वभावधर्मानुसार प्रत्येक मनुष्य त्या त्या वर्णांत गणला जात असे. व त्याच्या समाजातील आचारावरून त्याचा वर्ण ठरविला जात असे.

कोणी येथें असा आक्षेप घेतील कीं वर्ण याचा अर्थ हिंदु पद्धतिनें केला नाहीं. त्याला उत्तर एवढेंच कीं वर्ण या शब्दाची सर्वंकष व साधी अशी व्याख्याच नाहीं. परस्पर विरोध बराच आढळतो, यामुळेंच त्याचें मूलभूत स्वरूप कोणतें हें स्पष्ट करून त्यातील विपर्यस्त भाग काढून टाकून शुद्धस्वरूप कोणतें हें दर्शविणें आपलें कर्तव्य आहे.

संततीचा दर्जा ठरविणारा अनुवंशिकतेचा निर्बंध पुढील काळात आला. हेंच तत्त्व सामाजिक न्यायदानाची चालढकल करण्यास उपयुक्त ठरलेल्या अवतारकल्पनेच्या युक्तीस लागूं पडलें.

प्राचीनकाळीं काहीं व्यक्ती व केव्हां केव्हा तर सबच्या संघ ब्राह्मण पदवीस पोहोचल्याचें पुरावे सापडतात. हें सरळच आहे कारण मनुष्य जेव्हां आपल्या व्यक्तीत्वाचा विकास करीत करीत उच्च वर्णीयाच्या बरोबरीचा आपला दर्जा आपल्या आचरणानें इतराकडून ठरवून घेतो, तेव्हांच तो मान त्याला प्राप्त होतो.

प्राचीन कालीन समाजाच्या सूक्ष्म अवलोकनानेंच चातुर्वर्ण्याचें तत्त्व उद्‌भूत झालें असावें व या वर्णाच्या तत्त्वावरच हिंदुत्वाची सामाजिक घटना आधारलेली असावी. सद्यःकालीन हिंदुसमाज या मूळ कल्पनेपासून इतका दूर गेला आहे कीं, हा समाज पूर्वीं त्याच मूळ कल्पनेवर आधारलेला होता किंवा नाहीं अशी शंका उत्पन्न होते. अंतरजातीय विवाहाला बंदी असलेल्या अशा जवळ जवळ ३००० जाति आता उत्पन्न झाल्या आहेत. आतां सामाजिक उपयुक्तता आणि स्वभावधर्म यावरून जात ठरविली जात नाहीं, तर पित्याच्या जातीवरून पुत्राची जात ठरविली जाते. पिता ब्राह्मण असला तर पुत्र ब्राह्मण ठरतो, बाप जर इझावा असला तर मुलगा इझावा ठरतो, याला कांहीं इलाज नाहीं. हें प्राचीन समाजनेत्याच्या व कायदेपंडितांच्या उद्देशाला व समाजदृष्टीला अत्यंत विरोधी भासतें. अंतरजातीय विवाह ज्यांच्यांत होत नाहीं अशा कित्येक जातींचा जातिव्यवस्थेंत अंतर्भाव होतो व यामुळें तुटकपणा उत्पन्न होऊन तो तसाच पुढें अनुवंशिकतेच्या तत्त्वांवर आधारला जाऊन बऱ्याच जातींना जन्म देतो. हे गुणविशेष वर्णकल्पनेच्या गुणविशेषाशीं भिन्नत्व दर्शविणारे व साधर्म्य न दर्शविणारे असें ठरतात.

पाश्चात्य समाजातही अनुवंशिकतेचे हेंच तत्त्व प्रचारात आहे. उदाहरणार्थ पूर्वकालीं एकादा मनुष्य स्वपराक्रमानें व उदात्त स्वभावाच्या जोरावर सरदार होत असे. परंतु पुढें मात्र त्याला अवनत स्वरूप प्राप्त होऊन बाप सरदार होता ह्मणून मुलगा सरदार ठरूं लागला. बऱ्याच कुटुंबांत कौटुंबिक परंपरा व शिक्षण याच्या योगानें हें खरें ठरलें असलें

तरी अशीही बरीच उदाहरणें सापडतात कीं, ज्याना हे तत्त्व मुळीच लागूं पडत नाहीं. फ्रेंच राज्यक्रान्ती हें याचेंच फल होय.

पाश्चात्य देशांत उच्चवर्णीय होण्यास कोणत्याच प्रकारचा प्रतिबंध नाहीं. कोणीही उपाध्याय होऊं शकतो व विद्वान् होऊं शकतो. हिंदुस्थानात मात्र उपाध्येपण अनुवंशिक बनलें. अनुवंशिकतेच्या तत्त्वाचा हिंदुस्थानाइतका कोठेंच फैलाव झाला नाहीं. हें तत्त्व समाजाच्या नैसर्गिक व योग्य अशा व्यवहाराला विरोधी ठरतें. यायोगानें जात शारीरदृष्टया कमजोर होत जातें. अंतरजातीय रक्तसंबंध फायदेशीरच ठरतात. केव्हां ? जर जातीय भेद विशेष नसतील तर.

जातिव्यवस्थेवर उघड उघड व कडक रीतीनें टीका करणें योग्य नाहीं. लोकांच्या मनोभूमिकेंत खोलवर रुजून बसलेल्या सामाजिक चालीरीतींच्या बाबतींत शहाणपणानेंच वागलें पाहीजे. ध्येयवाद, लोकांच्या विचारांचें स्पष्टीकरण, अंधश्रद्धेचा उपहास आणि जनमनांवर छाप पाडणें इत्यादि उपायानींच कोणतेही सामाजिक प्रश्न सोडविलें पाहिजेत. प्रथमतः हा उपाय मानसिक स्वरूपाचा आहे. ज्या वर्गांतील लोकांची सुधारणा करावयाची त्या लोकाची मनोभूमिका ध्येयाच्या व विचारजागृतिच्या सहाय्यानें तयार केली पाहिजे, म्हणजे या नूतन मनोवृत्तीच्या योगानें त्याच्या चालीरीतींत आपोआपच बदल होत जाईल. इतकें झाल्यानंतरच कायदे करण्यास प्रवृत्त झालें पाहीजे. आपणाला जर लोकांना धार्मिकवृत्तीचें करावयाचें असलें तर आपण धार्मिक विधींत कांहीं फरक घडवून आणत नाहीं तर लोकांच्या धर्मश्रद्धेला जागृत करतो. असें जर झालें तर त्या विधींत फरक घडून येतील किंवा

कांहींचा लोप होईल. हेंच तत्त्व सामाजिक बाबतींत लागूं करावयाचें. प्रथम ध्येयाचें व विचाराचें स्पष्ट विवेचन होणें अत्यंत आवश्यक असतें. चालीरीतीवर वृथा टीका करणें योग्य नाहीं. लोकांच्या जीवितावर परिणाम होत नाहीं तर मग त्याचा उपयोग काय ? कितीही महत्वाचा कायदा असला तरी त्याला दुय्यम स्थानच दिलें पाहीजे.

कालाच्या ओघात जातिसंस्थेचा लोप होणारच. तशी क्रिया चालूंच आहे. जेव्हा अत्यंत आणीबाणीचा प्रसंग येईल तेव्हा स्वभावधर्म व जबाबदारी या तत्त्वावरच परस्परवर्गांतील संबंध स्थिर असावेत अशी समाजाच्या मनाची त्यावेळीं तयारी होईल व याच तत्त्वावर भावी समाजघटना कायम होईल. दुसऱ्या शब्दात ह्मटलें ह्मणजे चातुर्वर्ण्याचें तत्त्वच समाजाला काहीं कालपर्यंत मार्गदर्शक होईल. जातिसंस्था विरहित वर्णव्यवस्थाच चालू राहील.

जातिचा आपोआपच लोप होणार, हें खास. तो नवीन ध्येय व नवी मनोभूमिका याच्या सहाय्यानेंच होणार; जातिकलह आणि कायद्याची जबरदस्ती याच्या सहाय्यानें मात्र नव्हे. नाहीं तर त्याचें सामाजिक परिणाम तीव्र स्वरूपाचें होतील. सर जॉर्ज बर्डवुड् ह्मणतोः-
" जातिसंस्थेचा लोप हें हिंदुस्थानावरील मोठें संकट आहे. या योगानें हिंदुस्थान हें जगातील दलितवर्गाचें वसतिस्थान बनेल. "—
( The real danger which threatens India is that the caste-system may be broken down. It would make India the East End of the world. ) हे जर योग्य रीतीनें वाचलें तर त्यांत बराच अर्थ आहे असें दिसेल.

जगांतील सर्व विभागांतील वर्ग संबंधांना हेंच तत्त्व लागूं पडतें. समाजघटनेंतील विषम व अन्याय्य वर्गसंबंधाकडे जग दिङ्मूढ दृष्टीनें पहात आहे, आणि याला उपाय ह्मणजे समाजरचनेंतील नैसर्गिक वर्गांचें सेंद्रिय संबंधाच्या तत्त्वाचें पुनरुज्जीवन हाच होय. विशुद्ध कल्पना व त्याला पोषक असें ध्येय याच योगानें मानवतेची प्रगति श्रेयस्कर स्वरूपाची होईल. इतर सर्व उपाय अयशस्वीच ठरणार.

चातुर्वर्ण्याचें तत्त्व हें विश्वव्यापक तत्त्व आहे याच्यावर पुन्हा जोर देणें आवश्यक आहे. चार प्रकारचे वर्ग सर्व वंशामध्यें व सर्व संस्कृति मध्यें सर्ववेळीं आढळतात, व तेंच मूलभूत तत्त्व सर्वत्र लागूं पडतें.

हिंदुस्थानांत ' वर्ण ' या शब्दाला बऱ्याच लोकांचा विरोध आहे, ही खेदाची गोष्ट आहे. जर त्यांनीं मूळ स्वरूपांतील वर्णाच्या कल्पनेकडे बारकाईनें पाहिलें तर त्यांना त्या कल्पनेचा जातिव्यवस्थेच्या दोषांचें निरसन करण्याचें कामीं फार उपयोग होईल.

जर त्यांना त्या शब्दाबद्दलचा विरोध घालवितां येत नसेल तर मानवी समाजातील त्या चार संघांना त्यांनीं कोणतेही नाव ठेवलें तरी हरकत नाहीं, परंतु त्या वर्गांना ' नैसर्गिक ' किंवा ' शैक्षणिक ' वर्ग असें ह्मणा ह्मणजे झालें. ते कोणत्या अर्थानें वापरलें जातात हें समजलें ह्मणजे झालें मग ते शब्दप्रयोग कोणतेही असोत.

दुसरा महत्वाचा मुद्दा असा आहे कीं, वर्ण हे कधींही स्थापन करावे लागत नाहींत, कारण ते सर्वदा कायमचे आहेतच. याच आधारांवर माणसामाणसांत भेद कधीं केला जात नाहीं. भेद हा कायम स्वरूपाचाच आहे व कितीही प्रयत्न केला तरी त्याचा लोप होणार नाहीं.

हें प्राचीन शब्दप्रयोग आपणाला कार्यक्षम अशा समाजाची मूलभूत घटना समजून घेण्यास फार उपयोगीं पडतात. त्याचा उपयोग मात्र चार स्वतंत्र गट उत्पन्न करण्यास्तव केला जाता कामा नये. कारण या योगानें पुन्हां जातिसंस्थाच स्थापन होईल व अशानें जातिला प्रतिबंध करण्याच्या उद्देशाला हरताळ फासला जाईल.

नैसर्गिक वर्गांना स्वतत्र व तुटक वर्ग मुळींच न समजतां समाजाच्या मूलभूत घटनेचें एक दृश्य योग्य प्रकारें दर्शविणारें व प्राचीन समाजशास्त्रज्ञांनीं ज्याला 'वर्णसंकर' ह्मटलें आहे, याबद्दलचें सामाजिक धोरण दर्शविणारें असें एक चित्रण होय असें समजलें जावें.

येथपर्यंत झालेल्या विवेचनाचा सारांश असा देतां येईल;—

जे कांहीं अत्यंत आवश्यक आहे ते ह्मणजे बंधुभाव व व्यवहार ज्ञान—(**All that is necessary is brotherhood and common sense.**) परंतु सर्वसाधारणतः लोकांचा ओढा सुलभ मार्गाकडे फार. उच्च दर्जाच्या सत्याकडे सामान्य ह्मणून दुर्लक्ष केलें जातें; आणि जितकी गोष्ट सोपी तितकें त्याच्या स्पष्टीकरणार्थ जास्त शब्द खर्च करावें लागतात. हें समजणें सोपें आहे कारण सुलभ जे असतें ते एकेरी (one fold) असतें, आणि तेंच जर समजलें नाहीं तर मात्र कितीही शब्दावडंबर माजविलें तरी तें कळत नाहीं. जीवनांतील अत्यंत श्रेष्ठ वस्तु अत्यंत सुलभ असतात ह्मणून त्या दुर्लक्षिल्या जातात—(**The greatest things in life are the simplest, and therefore they are passed by so easily.**)

तेव्हां अत्यंत निकड कशाची असेल तर ती बंधुत्वाची भावना व व्यवहार ज्ञान यांची होय. इतराशीं असलेला फरक व व्यक्तींच्या वैशिष्ट्याची किंमत ओळखणारे व्यवहार ज्ञान आणि विविध प्रकारच्या संघातील व्यक्तींचें ऐक्य व संघटनाशीलत्व, इतकेंच नव्हे तर या संघाचें अखिल मानवी समाजांत तीच ऐक्य व संघटनेची भावना व आचरण प्रत्ययास आणून देणारा बंधुभाव, याची अत्यंत आवश्यकता आहे. हृदयातील इच्छा मनानें ओळखून, त्याप्रमाणें आचरण घडणें हें हृदय, मन व आचार यांचा समतोलपणा दर्शविते. हें कार्य समाजनिष्ठ व्यक्तीला व व्यक्तिनिष्ठ समाजाला अत्यंत हितावह आहे कारण दोन्हीही अंतर्यामीं एकच आहेत—

( The heart must desire, the mind must see and the action must bespeak that heart, mind and action are well-balanced. This is in the interest of the individual-in-society as well as of society-in-individual which is at heart one and the same. )



## प्रकरण २ रें.

# वर्णसंकराचें भय.

आपल्या चातुर्वर्ण्याच्या तत्त्वाचे परीक्षणात पुन्हां एकदां हिंदु-समाजशास्त्राकडे वळूं. त्यांच्या धर्मग्रंथात आपणाला 'वर्णसंकर' या शब्दप्रयोगाचा उल्लेख केलेला बऱ्याच वेळेला आढळतो. यात धोक्याची सूचना आहे. क्वचित् स्थळीं अंतरजातीय विवाह प्रतिबंधक या अर्थानें ही त्याचा उल्लेख आहे.

प्राचीनकालीन वर्गावर्गामध्यें—जे वर्ग पुढें जाति झाल्या—विवाह संबंधाचा प्रचार होता किंवा ती गोष्ट शक्य होती, याबद्दलचा पुरावा धार्मिक व ऐतिहासिक ग्रंथांतून सापडतो. पुढील कालात जसजसे निरनिराळ्या वंशांच्या लोकांशीं संबंध आले तसतसे मिश्र विवाहाला प्रतिबंधक असें विविध प्रकारची सामाजिक बंधनें निर्माण झालीं, आणि वर्णसंकराला अनुकूल आज्ञाचा प्रसार करण्यात आला व अर्थात् काहीं कालखंडात त्याचा अंतरजातीय विवाह पापरूप आहे असें ठरविण्याला दुरुपयोगही झाला. याप्रकारचें अर्थप्रतिपादन हें नंतरच्या कालात मधेंच कोणीतरी घुसडून दिल्यासारखें असून त्यावरून मूळ वचनांच्या सम्यक् ज्ञानाचा अभाव स्पष्ट होत आहे.

बंधनांना पूर्णपणें दोषी ठरविणें योग्य नाहीं. विशिष्ट संघांतील विवाहसंबंध विशिष्टकालीं उपयुक्तही ठरले असतील. भारतीय इतिहासा-

च्या विशिष्ट कालखंडात अंतरजातीय विवाहावरील बंधन सांस्कृतिक दृष्ट्या कांहीं कालपर्यंत श्रेयस्कर ठरलें असलेंही, परंतु जेव्हा त्याचें कार्य संपलें व त्याला स्वतंत्र कायद्याचें स्वरूप प्राप्त झालें, तेव्हा तें समाजहिताला अपायकारक ठरूं लागलें.

ज्याविषयीं धर्मग्रंथात इतकें उल्लेख आहेत त्या आज्ञा तरी कोणत्या आहेत व प्राचीन हिंदु समाजशास्त्रज्ञाच्या दृष्टीनें ' वर्णसंकर ' म्हणजे काय हें आता आपण पाहूं.

हें अवगत होण्याकरता ' समाजरचना '(Social composition ) व ' समाजघटना ' ( Social Constitution ) यांतील भेद लक्षात घेणें अत्यंत आवश्यक आहे. समाजसंघ व व्यक्ती यांच्या मधील नैसर्गिक सेंद्रिय स्वरूपाचा अधिकारपरत्वें ठरलेला परस्परसंबंध म्हणजे ' समाजरचना. ' हें मंदगतीनें झालेल्या उत्क्रान्तिचें दृश्यस्वरूप होय. सामाजिकरणास उपयुक्त अशा अज्ञात क्रियेमुळें (Unconcious activity) स्थापन झालेलें नैसर्गिक मानवीसंघ म्हणजेच समाजरचना होय. याचें अगदीं साधें स्वरूप म्हणजे कुटुंब. कुटुंब ही संस्था नसून एक निसर्गाचें कार्य आहे (The family is not an institution, it is a natural phenomenon.) उलटपक्षीं आधुनिक समाजाची समाजरचना म्हणजे समाजघटना होय. ही समाजरचनेवरच आधारलेली असली तरी तिचें स्वरूप पद्धतशीरपणें घडविलेलें आहे. हें समाजविरोधी अशा अज्ञातपणें झालेल्या क्रियेचें कार्य आहे. ' समाजरचना ही समाजदृष्ट्या उपकारक आहे, परंतु ' समाजघटनेंत ' मात्र दोष दो आहेत. आणि या दोषांचें प्रमाण अलिकडे तर फारच वाढलें आहे.

प्राणीसमाजामध्यें आपणाला फक्त समाजरचनाच दृष्टोत्पत्तीस येतें. उदाहरणार्थ भुंगे, मुंग्या, हत्ती व इतर. ते संघ नैसर्गिक व अज्ञात-पणें बनलेलें आहेत ह्मणून त्यांच्यांत समाजघटना नाहीं. दोषी व समाजविरोधी क्रियेची प्रतिक्रिया ह्मणजे मरणच होय—

**(The reaction to pathological anti sociality, is a death penalty or outcastiug. )**

मानवी समाजाच्या समाजानुकूल उपजत बुद्धीनुसारच समाज-रचनेची वाढ होतें. याच्या उलट समाजघटनेची वाढ मानवांच्या किंवा कांहीं संघाच्या स्वार्थदृष्टींतून बौद्धिक चालनेमुळें होतें.

समाजरचना नैसर्गिक किंवा सांस्कृतिक रचना दर्शवितें; तर समाजघटना अधिकारपरत्वें बनलेली रचना दर्शवितें. समाजघटनेंत समाजांतील शारीरीक किंवा आर्थिक दृष्ट्या संपन्न व कावेबाज (Cuuning) असलेले वर्ग वरच्या पायरीवर चढतात. यामुळें समाजातील समतोलपणा नष्ट होतो.

वर्णसंकर विषयक वचनाचा नीट अभ्यास केल्यावर असें वाटतें कीं, त्याचा उद्देश समाजरचना व समाजघटना यांतील साम्य दर्शविण्याचा नाही. जातिसंकराला प्रतिबंध करावा असा मूळ उद्देश नव्हता. प्राचीन समाजशास्त्रज्ञांचा हेतु एवढाच कीं, प्रत्येक मनुष्यानें आपल्या धर्माप्रमाणें त्याला योग्य असलेलें समाजकार्य करावें. एकाद्या व्यक्तींची योग्यता व त्याचा धंदा आणि समाजांतील त्याचा दर्जा याच्यातील वैषम्य ह्मणजे वर्णसंकर होय —

**( The non-correspondence between the suitability of the individual and his profession and place**

on the social ladder constitutes the ' confusion of Varnas'. )

प्राचीन ग्रथातून खऱ्या अर्थाने वर्णसंकराचें भय विखुरलेलें आढळतें. पुढें पुढें सामाजिक तत्त्व व ध्येय याचा सत्यस्थितीशीं विपर्यास होऊन संकराचें तत्त्व जातींना लागू केलें गेलें, व याच तत्त्वाला प्रतिबंध करण्याचा खरा उद्देश असताही हेंच तत्त्व दृढमूल होऊन बसलें.

गीतेच्या अठराव्या अध्यायात चातुर्वर्ण्याच्या कर्तव्याचा उल्लेख झाल्यानंतर असें वचन आहे कीं,

' स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ॥
स्वकर्म निरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु ॥४५॥

" आपण आपल्या कर्मांत रत राहून मनुष्य मोक्ष प्राप्त करून घेतो. आपल्या कर्मांत रत राहिलेला मानव प्राणी कोणत्या रीतीनें मोक्षाला पावतो ते ऐक." नंतर पुढें असें ह्मटलें आहे कीं,

" श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात् स्वनुष्ठितान् ॥
स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥४७॥

" परधर्म सुकर असला तरीं सुद्धा त्याच्यापेक्षा विगुण असा स्वधर्म जास्त चागला होय. स्वभावाला अनुरूप असें कर्म करणाऱ्याला पाप लागत नाहीं "

' स्वभाव ' (One's own nature) ह्मटला ह्मणजे वैयक्तिक स्वभाव, सामर्थ्य, संस्कृति, इत्यादि विविध धर्मांचा त्यात अन्तर्भाव होतो. ज्या तत्त्वज्ञानात वैयक्तिक विकासावर व पुनर्जन्मावर बराच जोर दिला आहे त्याच तत्त्वज्ञानांत अनुवंशिकतेच्या तत्त्वाला बरेंच प्राधान्य

असावें हें योग्य दिसत नाहीं. पाश्चात्यातही अनुवंशिकतेच्या तत्त्वाला मान आहे तरी पण वैयक्तिक स्वभाव व गुणधर्म यांची उपेक्षा केली जात नाहीं.

वर्णसंकराचा जो बाऊ केला आहे तो अनुवंशिक, आर्थिक किंवा वंश इत्यादि स्वरूपाचा नसून शुद्ध सांस्कृतिक स्वरूपाचा आहे. खालील प्रकार जर घडून आलें तर मात्र भितीचा प्रसंग उद्भवेल:— जर नीच स्वभावाचा मनुष्य गरीबाचा काळ होऊं लागला; जर एकादा अनीतिमान् मनुष्य मोठ्या प्रमाणात एखादा धंदा करूं लागला; जर एकादी व्यक्ती स्वतांची प्रतिष्टा वाढावी या लालसेनें राष्ट्रांत जर बलिष्ट होऊं लागला; स्वमहात्म्य वाढावें ह्मणून जर एकादा अध्यात्मिक उपदेश करूं लागला; जर अपरिपक्व बुद्धीचा मानव कांहीं संस्थांची स्थापना करूं लागला इत्यादि इत्यादि; परंतु जर लोकांतील संघच्या संघ याप्रमाणें इतर वर्गाचें आचार आत्मसात् करूं लागलें तर यापेक्षां बराच मोठा धोक्याचा प्रसंग उद्भवेल. आणि सद्यःस्थितींत सर्वत्र हेंच घडत आहे. यांतच पौर्वात्य आणि पाश्चात्य देशांतील घोटाळ्याचें व संकराचें मूळ आहे. सद्यःकालीन सामाजिक घोटाळ्याबद्दल व वर्णसंकराबद्दल कोणत्याही वर्गानें इतर वर्गांना दोष देण्याचें कारण नाहीं, कारण प्रत्येक वर्गानेंच आपापल्या परी त्या संकराला मदत केली आहे.

पुराणांतून हल्लीच्या कलियुगांतील वर्णसंकराचें भविष्य वर्तविलेलें आपणांस आढळतें. तत्कालीन समाजांत याप्रकारची कांहीं लक्षणें प्रथमावस्थेंत असलेली प्रत्ययास आली असतील व यावरूनच प्राचीन शास्त्रज्ञाच्या दूरदृष्टीबद्दल कौतुक करावें तितकें थोडेंच आहे.

जेव्हां आपण ते वाचूं लागतो तेव्हा त्यातील आधुनिक समाजाच्या संपूर्ण व्यंगचित्राचें वर्णन पाहून हसूं येतें. खालचे दोन वर्ग समाजाच्या प्रत्येक कार्यक्षेत्रात फाजील पुढाकार घेण्यास पुढें पुढें येतात हेंच या संकराचें मुख्य तत्त्व आहे. याकरता वाचकानीं विष्णुपुराणातील ६ व्या विभागांतील पहिला अध्याय अवश्य पहावा, परंतु त्यांतील ब्राह्मण शूद्र इत्यादि शब्दप्रयोग त्याच्या वर्णविषयक अर्थानें वाचावेत, जातिविषयक अर्थानें वाचूं नयेत.

'कलियुगात शूद्र ( कामगारवर्ग ) राजे बनतील.' (वि.पु.) जगातील बऱ्याच भागात मजूरवर्ग आपल्या वर्गाला विशेष महत्वाचा समजतो आणि कांहीं भागात तर मजूरांचें राजे (Labour Kings) ह्मणून कांहीं मानवांचा अंमल चालू आहे. 'सर्वलोक आपण ब्राह्मणांच्या बरोबरीचें आहोत असें समजूं लागतील.' जगातील कांहीं भागांतील खालच्या वर्गातील लोकाचा कल अशाच प्रकारचा आहे ह्मणजे ते आपल्याला न्यूनगंडत्वाच्या भावनेनें पुढारी वर्गाच्या बरोबरीचे समजतात. त्यांची ही भावना क्षम्य ठरते कारण कांहीं प्रसंगीं पुढारी सुद्धा त्या जागेकरतां योग्य व लायक नसतात.

'ततश्चार्थ एवाभिजनहेतुर्धनमेवाशेषधर्महेतुरभिरुचिरेव
दाम्पत्यसंबन्धहेतुरनृतमेव व्यवहारजयहेतुः स्त्रीत्वमेवोपभोगहेतुः'
( ४–२४–२१ ) ( वि. पु. )

"संपत्ति हेंच कुलीनपणाचें साधन. द्रव्य हेंच सर्व धर्मांचें कारण, आपली रुचि हेंच विवाह संबंधाचें साधन, असत्य हेंच व्यवहारांत जय मिळविण्याचें साधन आणि केवळ स्त्रीत्व ( कुल वगैरे

नव्हे ) उपभोगास कारणीभूत होईल. ”

‘ यो यो ददाति बहुलं स स स्वामी तदानृणाम् ॥
स्वामित्व हेतुः संबन्धो भावी नाभिजनस्तथा ॥

( ६-१-१९ )

“ जो जो ह्मणून मनुष्य पुष्कळसें द्रव्य देईल तो तोच ( सेवकांचा ) धनी होईल; ( त्याची अमुकच जात असली पाहिजे; असें नाहीं ). कारण द्रव्यदानाच्या योगानें घडलेला संबंध हाच त्यावेळीं धनीपणाला कारण होईल व कुल हें तसें कारण होणार नाहीं. ”

‘ खालच्या वर्गांतील लोक व्यापारधंदा करूं लागतील. ’ वरील सर्व उतारे ‘ मोठा वाईट लांडग्याचा ’ वर्ग ह्मणजे (big bad wolf) भांडवलशाही वर्ग यालाच उद्देशून आहे कारण तो आपलें समाजविषयक कार्यापासून पराङ्मुख बनतो व बनला आहे. ‘ जीविताच्या सर्व अवस्था सर्व मानवांना सारख्याच राहतील, ’ हें सांस्कृतिक दृष्टया सर्वांना एका पातळीवर आणण्याचा उद्देश दर्शवितें. मवाळ व जहाल साम्य-वादी लोकांचा कल श्रमजीविवर्गाचें महात्म्य वाढवून त्याच्या बरोबरीला इतर वर्गांना आणून बसविण्याकडे आहे व एकदां होता ही

‘ रत्नताम्र भागितैव पृथ्वी हेतुर्ब्रह्मसूत्रमेव विप्रत्व-
हेतुर्लिंगधारणमेवाश्रम हेतुरन्याय एव वृत्तिहेतुः ॥२१॥

( वि. पु. )

रत्नें आणि ताम्र यांनीं युक्त असणें हेंच भूमीच्या उत्तम-त्वास कारण, यज्ञोपवीत हेंच ब्राह्मणत्वाचें साधन, त्या त्या आश्रमांतील चिन्हें धारण करणें हेंच त्या आश्रमाचें साधन व अन्याय हेंच उप-

जीविकेचें साधन होईल. " यावरून आधुनिक संस्कृतिचा बहिरंगीपणा ( Superficiality ) व लोकाच्या संस्कृतिविषयक आदराचा अभाव स्पष्ट होत आहे. संस्कृतिचें उपासक असें कलावन्त, विद्वान् अभ्यासक किंवा लेखक यांचा समाजांतील दर्जा व इतर वर्गांतील लोकाचा दर्जा याचीं तुलना केल्यास पहिल्या वर्गाला फारच थोडा मान मिळतो असें दिसतें.

आपण ज्या कालखंडात अतां आहोत तो काल श्रमजीवी व व्यवसायी ह्मणजे शूद्र व वैश्य या वर्गांचा आहे. ते आपापसांत सत्तेकरतां भांडत आहेत. परंतु दोन्हीही वर्ग सद्यःकालीन राष्ट्रकारणाचा गाडा हांकण्यास योग्य ठरणार नाहींत हें थोड्याच कालांत प्रत्ययास येईल. अनिर्बंध व्यापारी भांडवलशाही समाजाला जाचक ठरेल. राज्य करणें हें काहीं व्यापाऱ्यांचें कार्य नव्हे. चार वर्गांतील अत्यंत नीच वर्गाची सत्ता तर यापेक्षा हानिकारक ठरेल. मार्गदर्शकत्वाचें व शासनाचें कार्य सामान्य जनतेनें करावें हें योग्य नव्हे व तसा उद्देशही नाहीं—तें कार्य ज्यांच्या अंगीं कर्तबगारी, शीलसंपन्नता, व सामाजिक कर्तव्याची जाणीव आहे अशा प्रकारच्या व्यक्ती असलेल्या संघानेंच करावयाचें आहे—( It is not the masses that are meant to guide and rule but the groups of persons that have the ability, the character, and the social duty to guide and rule. ) लेखक ह्मणतो कीं, ऐक्यसंपादन हें अध्यात्मिक व आंतरिक स्वरूपाचें कार्य आहे आणि तें सामाजिक स्वरूपाचें होणें कधींच शक्य नाहीं— ( Equality is a spiritual &

heart-factor, and can never be a social one. ) सामाजिक व राजकीय समता प्रस्थापित करण्याचें विचार व ध्येय हें सर्व इतकें अशास्त्रीय आहेत कीं ते मूर्खपणाच्या पायरीला जाऊन पोहोंचतात, कारण ते समाजाच्या नैसर्गिक वळणाला व सांस्कृतिक दृष्टीनें ठरविलेल्या सेंद्रिय विभागणीच्या तत्त्वाला विरोधी ठरतात.

आधुनिक जगाचें डोळे लोकशाही तत्त्वांतील उदात्त विचारांच्या मोहिनीनें व जवळच्या भूतकालात समाजाला तें तत्त्व उपयुक्त ठरलें या समजुतीनें अंध झाले आहेत आणि एकजणही ही लोकशाही पद्धति ' जनतेचें राज्य ' या खऱ्या अर्थानें अशक्य कोटींतील व व्यर्थ आहे असें उघडपणें जाहीर करण्याचें धाडसही करीत नाहीं.

पूर्वकालीन सांस्कृतिक दृष्टया श्रेष्ट दर्जाच्या लोकांचें स्वानुभवाचें बोल हेंच दर्शवितात कीं, सामान्य जनतेनें देशाच्या राज्यकारभारांत लुडबुड करण्याचें मुळींच कारण नाही. अत्यंत बुद्धीमान् अशा लॉ-झे ( Lao-Tze ) यानें आपल्या उच्चप्रतीच्या व व्यवहार्य तत्वज्ञानात्मक ते–तेह–चिंग ( Tao-Teh-Ching ) या ग्रंथात म्हटलें आहे कीं, ' सामान्य जनतेला राज्यपद्धतिचें प्रदर्शन दर्शवूं नये ' — ( The methods of Government must not be exhibited to the people " ) आणि ' लोकांचें ज्ञान वाढूं लागलें कीं लोकांवर सत्ता चालविणें कठीण जातें '—( the difficulty of governing the people arises from their having too much knowledge."—) यावरून एवढेंच स्पष्ट होतें कीं, जे ज्ञान त्या वर्णाला उपयुक्त नाहीं त्याची त्याला आवश्यकताच मुळीं नाहीं. पेरूच्या

( Peru ) तुपेक इंका युपाकी ( Tupac Inca Yupanqui ) या इंकावंशीय राजानें असें ह्मटलें आहे कीं, " शास्त्र हें सामान्य जनाकरतां नसून उदात्त विचाराच्या व उदारमनाच्या उच्चवंशाच्या लोकाकरतां आहे. खालील वर्गांचे लोक त्याच्या अभ्यासानें पोकळ गर्व बाळगतात व ते उद्धट बनतात. तेव्हां अशानीं राज्यकारभाराच्या बाबतींत मुळींच लुडबुड करूं नये, नाहीं तर त्यायोगानें अधिकारी वर्गांची अपकीर्ति होईल व अंतिम स्वरूपात हें करणें राष्ट्राला अत्यंत विघातक ठरेल"।— Science was not intended for the people, but for those of generous blood. Persons of low degree are only puffed up by it and rendered vain and arrogant. Neither should such meddle with the affairs of government, for this would bring high offices into disrepute and cause detriment to the state. ) 'वंशाच्या' ( blood ) उल्लेखा खेरीज बाकी सर्व विधानें नैसर्गिक चातुर्वर्ण्याच्या तत्त्वानुसारच आहे. जाता जाता असें ह्मणतां येईल कीं, वर्णसंकरामुळें सद्यःकालीं मुद्रा 'विज्ञान' ( Science ) हें भलत्याच्याच हातीं गेलें आहे व याचा परिणाम विषारी वायू व युद्धोपयोगी शस्त्रसंभार यांची अतोनात उत्पत्ति यावरूनच दिसून येतो.

उपरिनिर्दिष्ट प्रमेयांवरून असा मात्र अर्थ काढतां येत नाहीं, कीं, जर मजूरवर्गातून शासनसंस्थेचें सम्यक् ज्ञान असलेला व शीलसंपन्न असा एकादा मनुष्य राजयोगावर जन्माला आला असेल, तर त्यानें राजकुटुंबात जन्मास आलेल्या परंतु वास्तविक त्याची गुणसंपत्ति

जर खालच्या वर्गाची असेल तर अशाला पदच्युत करून आपली हक्काची जागा घेऊं नये असें मात्र नव्हे. स्त्रीविषयक एक जुनी म्हण प्रजेतील वर्गांना चांगल्या प्रकारें लागू पडतें. ती अशी "त्यांच्याविषयीं जितकें थोडें बोलावें व पाहावें तितक्या त्या अधिक सद्गुणी व उदात्त होतात"—( The less they are talked about and noticed, the more virtuous and noble they are." ) असें मात्र म्हणता येणार नाहीं कीं, काल बदलला आहे व म्हणून जुन्या म्हणी या नव्या परिस्थितीला लागूं पडत नाहीत. 'समाजाच्या बाह्य स्वरूपात बदल घडून येईल, सुधारणामार्गातील यंत्रयुगामुळें विशिष्ट प्रश्न, विशिष्ट गरजा व त्या मोडविण्याची विशिष्ट पद्धति इत्यादि उद्भूत होतील, परंतु मूलभूत असें मानवी हितसंबंध कधींही बदलत नाहींत.'—( Outer forms of society may change, the machine stage in any civilisation may produce particular problems, needs and solutions, but the fundamental human relations do not change. )

सुधारणेच्या निरनिराळ्या अवस्थामध्यें लोकांच्या वर्गातील परस्पर संबंधात थोडे फार फरक होतात आणि एखादा दुसरा वर्ग राजकीय जीवनात, जनतेच्या आवडीमुळें अयोग्यप्रकारें पुढें येतो.

पाश्चात्य देशात तिकडील समाजाच्या अत्यंत कनिष्ठ वर्गांकडून आधुनिक सुधारणेला फारच मोठा धोका पोहोचणार अशा प्रकारच्या सूचना बऱ्याच चांगल्या चांगल्या लेखकांनीं दिलेल्या आहेत. हेगेल, नीत्से, व इतर समाजशास्त्रज्ञांनीं येणारा भविष्यकाल 'लोकनायकांचा'

( Mass-man ) आहे असें भाकीत केव्हांच केलें होतें. समाजशास्त्राचा जनक जो कोम्टे ( Comte ) ह्मणतो कीं, " सध्याचें क्रान्तियुगात नूतन अशा अध्यात्मिक शक्तीवांचून तरणोपाय नाहीं, नाहीतर विनाशकाल ठरलेलाच आहे "—( But for a new spiritual power our age which is an age of revolution will bring about a catastrophe— ). नुकताच दिवंगत झालेला जर्मन समाजशास्त्रज्ञ स्पेंग्लर ( Spengler ) यानें तर पाश्चात्य सुधारणेच्या विनाशाचें भविष्य आधींच वर्तविलें आहे. इतर समाजशास्त्रज्ञानीं सुध्दा सामान्य जनतेचें सहाय्य संपादनाला बरेंच गंभीर स्वरूप दिलें आहे. यापैकीं एक स्पॅनिश समाजशास्त्रज्ञ डॉन जोंस ऑरटेगा गॅसेट— ( Don Jose Ortega Gasset ) हा आहे. यानें एक विचारप्रवर्तक व सुप्रसिद्ध असा ' Rebellion of the Masses ' ( जनतेचें बंड ) हा ग्रंथ लिहिला आहे. जगांतील निरनिराळ्या देशांत सामान्य जनता दिवसेंदिवस सामर्थ्यसंपन्न, व चळवळींत बरीच पुढें पुढें येऊं लागल्यामुळें संस्कृतिला व सुधारणेला किती धोक्याचें आहे हें या लेखकानें स्पष्टपणें दर्शविलें आहे. अविचारी व्यक्तींच्या ( Unscrupulous individuals) नेतृत्वाखालील जनता अविचारी — अविचारी अशा करतां कीं त्यांत त्यांचा कांहीं तरी क्षुद्र मोठेपणा मिळविण्याचा स्वार्थ असतो—अंध व बधिर असते. सामान्य जनतेमध्यें बौद्धिक व नैतिक दृष्ट्या रानटी लोकांचाच भरणा फार असतो व ते संस्कृतिला मानीत नाहींत, सुसंकृत समाजांतही योग्यप्रकारें सेवा करण्याचें टाळतात व समेटाला केव्हाही तयार नस-

तात. सर्वप्रकारच्या सामाजिक कार्यक्षेत्रात सामान्य जनता प्रमुख स्थान पटकावूं लागली. आर्थिकदृष्ट्या निरोप नसले तरी सामाजिकदृष्ट्या असमाधानवृत्ति, कुरकुरा स्वभाव, व बंडखोरवृत्ति इत्यादि हें त्यांचे गुणविशेष बनले. सामान्यजनता अंधच असते. सामान्यतः हें अंधत्व अज्ञानजन्य असतें, व त्याना त्याचें प्रथत्न, आपण व मजूरवर्ग एकच या भावनेनें—वास्तविक ते तसें नाहींत—श्लाघ्य आहेत असें वाटणें ही त्यांची भ्रान्ति होय. हें अधिक धोक्याचें असतें कारण अंध ध्येय-वादासारखें धोक्याचें दुसरें काहींच नाही.

काहीं वर्षांपूर्वी ज्यावेळीं गॅसेटने आपला ग्रंथ लिहिला त्यावेळीं स्पेन जरी राजकीय क्षोभात होता तरी त्यामानानें बरीच शांतता नांदत होती. राजकीय व धार्मिक भ्रष्टतेमुळें चिडून स्पेनमधें 'लोक-नायकानें—' (Mass-man) आपल्या स्वार्थी व विघातक कार्यक्रमाला निर्धास्तपणें सुरवात केली होती. तो दोन्ही बाजूंनीं लढत होता. जरी क्वचित् प्रसंगीं हिंदु मुसल्मानाचे दंगे व याचप्रकारचें इतर दंगेधोपे होत असलें व यायोगानें 'जनता' आपलें स्वरूप प्रगट करीत असली तरी वरील अर्थानें—Masses या अर्थानें 'जनता' हिंदुस्थानात अद्याप तयार नाहीं. या बाबतींत तरी सुदैवानें हिंदुस्थान पाश्चात्यांच्या बरीच वर्षे मागें आहे. पाश्चात्यांच्या अनुभवानें शहाणे होऊन सुबुद्ध लोकांचें समाजाला मार्गदर्शकत्व लाभल्यास समाजाची सध्याची अवस्था कायम राहण्यास कदाचित् मदत होईल.

सामान्य जनतेविषयींचा अनादर म्हणजे मानवी श्रमाचा किंवा उत्पादक वर्गांचा अनादर असा मात्र अर्थ समजूं नये.

ऑरटेगा गॅसेट 'लोकनायक'—Massman—याला एक अत्यंत उपकारक व तितक्याच प्रमाणात अत्यंत अपायकारक अशी एक व्यक्ती समजतो. पहिल्या प्रकारांत उत्पादकवर्ग आपल्या योग्यस्थळीं कार्य करीत असतो किंवा चारही वर्णांच्या लोकाचा त्यावेळीं मधुर संयोग झालेला असतो. दुसऱ्या प्रकारात मात्र तो हीन मानव ठरतो किंवा मानसशास्त्रीय शब्दात सांगावयाचें झाल्यास तो निर्बुद्ध मानव ठरतो—(Shadow of man). सत्यनिष्ट मानवाखेरीज इतर मानवाच्या अंतर्मनाचा असा एक धर्म असतो कीं, तो त्याच्या बहिर्मनाच्या क्रियेला पोषक ठरतो. बहिर्मन एखाद्या व्यक्तीला चांगली गोष्ट करण्यास सांगत असतें, तर अंतर्मनाचा धर्मविशेष त्याला वाईट गोष्ट करण्यास प्रवृत्त करतें. हें अर्धव्यक्तित्व साधारणतः दबलेलेंच असतें व जरि कांहीं प्रसगीं या अर्धव्यक्तित्वाचा विजय झाला तरी बहिर्मन व शुद्ध व्यक्तित्वच शेवटीं प्रभावी ठरतें. आधुनिक मानसशास्त्रानें ज्याला विशेष महत्वाचें मानलें अशा या अर्धव्यक्तित्वाला (Part-personality) पूर्वी 'पिशाच्च'—(Devil) अशी संज्ञा दिली जात असे. प्रत्येक मानवांत याप्रमाणें हें पिशाच्च किंवा 'दुष्टमन' असतें. मध्ययुगांतील ख्रिस्ती, दुष्टलोक (Devil), पौर्वात्य धर्मांतील तसेंच लोक, यांचा विचार प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञ डॉ. यंग यानें फार गंभीरपणानें केला आहे. त्याचा विचार मानसशास्त्रीय दृष्ट्या करावयाचा आहे. धर्मविषयक दृष्टीनें त्याचा विचार करावयाचा नाहीं.

सामान्यतः हें दुष्टमन (Shadow) दबलेलें असतें परंतु क्वचित् प्रसंगीं व्यक्तित्वाचा पूर्ण लोप होतो व दुष्टमनच सर्व व्यक्तित्व

व्यापून टाकतें. नंतर तें दुष्टमन आपलें स्थान मोडतें व त्याचा तें व्यक्तीवर अंमल सुरू करतें. यावेळीं बहिर्मन अंतर्मनात एकरूप होतें. अत्यंत वाईट प्रसगीं सामान्य जनाच्या भाषेत बोलावयाचें झाल्यास 'भूतानें पछाडलेला' ( Possessed by a devil ) असाच मनुष्य पुढें येतो. अशा गोष्टी फक्त पौर्वात्य देशातच घडतात असें नव्हे तर 'सुविद्य' ( enlightened ) अशा पाश्चात्य राष्ट्रातही असें प्रसंग वारंवार घडतात. मात्र पाश्चात्य राष्ट्रात हें 'भूत' धर्मोपदेशक काढीत नाहींत तर मनोविश्लेषणशास्त्रज्ञ त्याचा समाचार घेतात.

आपणाला असें काहीं प्रसंग आठवतात कीं, त्यावेळीं आपण जे केलें त्याबद्दल आपणाला पुढें लाज वाटूं लागतें. मग आपण म्हणतो कीं 'तो मी नव्हतो, मी स्वतः तो नव्हतो' ( It was not really I who did it, 1 was not myself. ) त्याक्षणीं आपण कशानें तरीं भारलें गेलों होतो. (Possessed by something ). हें अगदीं साधें उदाहरण आहे. एकंदरींत गुन्हेगाराच्या उपचारपद्धतींत आधुनिक मानसशास्त्रानें क्रान्ति घडवून आणण्यास सुरवात केली आहे हें खरें.

फक्त व्यक्तीलाच अंतर्मन असतें असें नव्हे, तर कुटुंब या साध्या संघापासून ते वर्ग, राष्ट्रे व मानवजात इत्यादि मोठ्या संघापर्यंत सर्व संघाना हें अंतर्मन असतें. जीविताच्या प्रत्येक कार्यक्षेत्रांवर हें मन आपली छाप पाडतें. प्राचीन हिंदुस्थानात या सामुदायिक दुष्टमनाला ( Collective Shadow ) 'अधर्मपुरुष' समजत असत. ज्या वेळीं मानवी संघ समोरासमोर असतात त्यावेळीं संघांच्या सामुदायिक

खऱ्या धर्माचा लोप होतो व पूर्वीचें सुधारलेलें व शांत अशा नागरिकाचें मन सामुदायिक विनाशाच्या किंवा इतर कोणत्याही भावनेनें भारलें जाऊन तें जंगली व राक्षसी वृत्तीचें बनतात. मन:सामर्थ्यसंपन्न व्यक्ती तेवढ्या या लाटेबरोबर वाहवल्या जात नाहीत. क्षुल्लक माणसें सामुदायिक भावनेच्या जोरावर कांहीं कृत्यें — जी एकट्या व्यक्तीनें कधींही केली नसती — करतात, सामुदायिक पिशाच्चसंचार व्यक्तीला भारावून टाकतो. व्यक्ती आपली जबाबदारी संघावर टाकून देतें कारण संघाला कांहीं जबाबदारी नसतें व आपण सामुदायिक भावनेवर नाचणारें बाहुलें बनतें. याचेंही बरेंच प्रकार आहेत व त्याल्या वेळीं कालभेदही असतोच. संघाशीं अज्ञातपणें एकरूप होण्याचें क्रियेला पारिभाषिक शब्द 'दुर्बोध भागीदारपणा' (Participation mystique) असा आहे या प्रकारचीं नमुनेदार उदाहरणें म्हणजे राजकीय दंगे, क्रान्तीच्या वेळेला केलेली अघोर कृत्यें व विनाश, धर्मवेडाणाचीं कृत्यें व अमेरिकेंतील निग्रोंना दिलेली स्वाधिकारातील शिक्षा इत्यादि आहेत. त्याप्रसंगीं विवेक बुद्धीला निद्रिस्त ठेवण्याकरता एक विशिष्ट ध्येय पुढें ठेवलें जातें.

दुसरें अत्यंत विघातक सामाजिक दृश्य म्हणजे बुद्धिपुरस्सर समाजविरोधी गुन्हे करणाऱ्या अमेरिकेंतील टोळ्या. याप्रकारात सामान्य मानवाला बुध्या व सावधपणानें समाजविरोधी संघात सामील करण्यात येतें व या संघाचा पुढारीवर्ग सुशिक्षित व सुबुद्ध अशा संघातील व्यक्तींचा बनलेला असल्यामुळें विशेष घातुक ठरतो.

जाता जाता हें सांगणें आवश्यक आहे कीं शारीरदृष्ट्या व्यंगपूर्ण मानवसुद्धा मानव जातीला फार घातुक ठरतो. उच्चदर्जाच्या लोकांपेक्षा

या प्रकारच्या लोकांची वाढ लवकर व मोठ्या प्रमाणात होते. याचे वंशज शारीरदृष्ट्या सदृढ असलेल्या लोकांपेक्षा सख्येनें जास्त वाढत आहेत, आणि अलिकडे जननशास्त्राचा ( Eugenics ) अभ्यास व उपयोग मूर्ख व गुन्हेगार लोकांना निर्वीर्य करण्याकडे होऊं लागला आहे. पुष्कळ देशांत तें कायद्यानें शक्य झालें आहे. बऱ्याच गुन्हेगार कुटुंबाचा चांगल्या रीतीनें अभ्यास केला गेला व त्यावरून बरेंच प्रकारचीं अनुमानें बसविण्यात आलीं आहेत. उदाहरणार्थ १७२० मध्यें न्यूयॉर्कमध्यें जन्मलेल्या एका उडाणटप्पू माणसापासून पुढील सात पिढ्यापर्यंत १२०० माणसें अशी दृष्टोत्पत्तीस आली कीं, तीं सर्व आळस, दुष्टपणा, सभोगवृत्ति, दारिद्र्य, रोग, बुद्धिमांद्य, वेडेपणा व गुन्हेगारवृत्ति इत्यादि लक्षणांनीं युक्त अशी होती. ३१० धंदेवाईक भिक्षेकरी, ४४० आपल्या स्वतःच्या रोगानीं पीडिलेले, अर्ध्यांपेक्षा अधिक स्त्रिया वेश्याव्यवसाय करूं लागल्या. १३० गुन्हेगार ठरलेले, ६० चोर, ७ खुनी, फक्त २० जण व्यापार धंदा शिकले, यापैकीं १० तुरुंगांत. एकंदरींत १२०० पैकीं १० ह्मणजे शेंकडा एकसुद्धा पडत नाहीं, इतकेंच लोक काय ते सर्वसाधारण चांगल्या स्थितींत होते. त्या सर्वांकरता देशाला १,२५०,००० डॉलर्स खर्च आला. जर हा एक मूळ पुरुषच निर्वीर्य केला गेला असता तर किती बरें झालें असतें. आधुनिक समाजशास्त्राचा हा उपकारच ह्मणावयाचा कीं, हे प्रश्न विचारांत येऊं लागले व तेही योग्यवेळीं. आतां निरनिराळ्या देशांत लहानशा शस्त्रक्रियेनें रोगी माणसाच्या अनुमतीनें निर्वीर्य बनविण्याचें शक्य झालें आहे ( अर्थात् खच्ची करणें नव्हे ! )

आपण शारीरशास्त्राचा जो आतापर्यंत विचार केला त्यालाच थोडासा धरून असलेला मजेदार व खळबळ उडविणारा असा संतति नियमनाच्या विषयाबद्दल जाता जाता दोन शब्द सांगणें बरें. ज्या अर्थीं समाजाची नैसर्गिक विभागणी सांस्कृतिक दृष्ट्या व अधिकारपरत्वें (hierarchical) झालेली आहे आणि ज्या अर्थीं कुटुंबातील मानवी व्यक्ति सांस्कृतिक प्रगतिच्या निरनिराळ्या अवस्थामध्यें आहेत, त्याअर्थीं त्या सर्वांना एकच दंडक लागू करणें व सर्वांकडून एकाच प्रकारच्या आचाराची अपेक्षा करणें हे तर्कहीन व अव्यवहार्य आहे—( Since the natural division of society is a cultural hierarchical one and members of the human family are on different stages of cultural development, it is illogical and impractical to ask them to conform to one standard and to require the same conduct from them all ). नैसर्गिक वर्गीकरणाच्या तत्त्वानुसार लैंगिक आत्मसंयमन व भोगत्याग हें उच्च वर्णाला लागू करणें, व ज्याना लैंगिक नियमन हें ध्येय असें वाटतच नाहीं अशा खालच्या वर्णाकरितां उपयुक्त अशी साधनें वापरणें हें योग्य होय. अशा स्थितींत आत्मसंयमन व साधनें या दोहोंचाहीं समाजाला उपयोग होईल व जर दोन्हींना स्वतंत्र साधनें ह्मणून मानलें तर मात्र त्यांचा विशेष उपयोग होणार नाहीं.

मानसिक समानतेकडे असलेला आधुनिक कल, याला आळा घालणें आवश्यक आहे. समतेच्या ध्येयातील घोटाळ्याचा हा परिणाम होय.

मुख्य गोष्ट अशी कीं, लोकाच्या मनात सद्यःस्थितींत असलेल्या जातिभेदाशीं मुळींच संबंध नसलेली अशी नैसर्गिक संबंधाविषयीची जाणीव उत्पन्न झाली आहे. उत्पादक, विभाजक, शासकवर्ग व सांस्कृतिकदृष्ट्या मार्गदर्शक वर्ग याचें एकाच मानवदेहांत सेंद्रियस्वरूपाचें संबंध कसे आहेत याच्या विषयीच्या दृष्टीचें पुनरुज्जीवन होणें आवश्यक आहे. ही मानसिक क्रांती घडवून आणण्याचें कार्य मुख्यतः करून उच्च वर्णाचेंच आहे, व यायोगानें सध्यां दिसत असलेली वर्गसंबंधविषयक विषमता नाहींशी होऊन पुन्हां पूर्ववत् मेळ बसेल. आतांच्या वर्णसंकराची कार्यकारण मीमांसा जर लक्षात आली तर पुन्हां सुसंबद्ध वर्गसंबंध सुरळितपणें चालण्यास अडचण पडणार नाहीं.

हिंदुस्थानातील खरे ब्राह्मण किंवा इतर देशातील उच्चवर्णीय लोकच—जे समाजाचे खरे पुढारी, लोकमनाचे मार्गदर्शक व सामाजिक मताला वळण देणारे आणि राजकारणांतील खरे कार्यकर्ते असतात तेच समाजांतील स्वार्थी दृष्टी व गोंधळ करणारी दृष्टी यामध्यें समन्वय घडवून आणण्यास समर्थ असतात. शेवटीं त्यांच्या प्रयत्नांच्या सहाय्यानें मानवी संस्कृतिचा पुनर्जन्म होईल. शासन करणें ( to rule ) हें त्याचें कार्य नव्हे. त्यांनीं अध्यापन व मार्गदर्शन एवढेंच करावयाचें. हें सुद्धां फारच महत्वाचें सामाजिक कार्य आहे.

एवंच जगाची आजची अत्यंत आवश्यक गोष्ट जर कोणती असेल तर ती ब्रह्म जाणणारा ब्राह्मण ह्मणजे सत्यज्ञानी पाहिजे ही होय. सद्यःकालीन जागतिक जाचक व घोटाळयाच्या घडामोडींत तो कोठें तरी पुन्हां जन्माला आला असेल, व समाजाची गरज भागवण्याकरतां तो

आपल्या धर्मकर्तव्यानुसार आचरण करीत करीत पुढें येईल हें खास. हें होणें अपरिहार्य आहे कारण, सामाजिक संकटप्रसंग जवळ येऊन ठेपला आहे व प्रसगात सामान्य जनता यशस्वी ठरेल किंवा उच्चवर्ण यशस्वी ठरेल.

राजकीय प्रश्नाचा विचार पुढें होणारच आहे. येथें मात्र सामाजिक प्रश्नच माडणें योग्य होय.

हा नूतन ब्राह्मण समाजाच्या सर्व वर्गातून पुढें येऊं शकेल. त्याचबरोबर हेंहि लक्षात ठेवलें पाहिजे कीं, जो कोणी सुविद्य व सुबुद्ध मानव पुढें येईल—कारण तो कोणत्याहि वर्गातून येऊं शकतो—त्यालामात्र ब्राह्मण असें समजूं नये. ' तत्वतः शीलसंपन्नताविरहित बुद्धिमत्तेमुळें वर्णसंकराला जोर मिळतो व अशी बुद्धिमत्ता पुष्कळ प्रसंगीं जगाला अहितकारक ठरते ' ( In fact, intelligence without character, promotes, confusion of natural classes, and in the majority of cases proves no blessing to the world ).

हिंदुस्थानात तरी पूर्वीच्या ब्राम्हण जातींमधूनच नवीन ब्राम्हण थोडें थोडकेंच पुढें येत नाहीत तर बरेंच येत आहेत. यूरोपमध्यें सद्यःकालीं सांस्कृतिक जागृतिचीं बरीच चिन्हें दिसत आहेत व दहा किंवा वीस वर्षापूर्वी केवळ मनोमय स्थितींत असलेला वर्ग आता वैज्ञानिक जगात स्फूर्तियुक्त असा नूतन ब्राम्हणवर्ग म्हणून निर्माण होत आहे.

हिंदुस्थानात अशी आशा वाटते कीं, शिक्षणाच्या, वाङ्मयाच्या किंवा इतर विविध प्रकारच्या शास्त्रीय अभ्यासाच्या क्षेत्रात वावरणारे

स्त्रीपुरुष स्वशक्तिनुसार चातुर्वर्ण्याचा प्राचीन तत्त्वविचार व ध्येय याचें विवरण करतील---विशेषतः स्वताच्या उदाहरणानें धडा घालून देतील--कारण कीं त्यायोगें सध्या असलेल्या वर्णसंकरावर उपाययोजना होईल, व याप्रकारें जातिव्यवस्थेचे दोष व इतर सामाजिक अंधपरंपरा आपोआप नाहीशा होतील व असें झालें ह्मणजे खिस्ताचें खालील ह्मणणें हिंदुस्थानच्या तरी लागूं करण्याची पाळी येणार नाहीं. " आपल्याच विरुद्ध असलेलें राज्य लवकर विनाश पावतें; व प्रत्येक कलहयुक्त व विभक्त शहर किंवा घर स्थिर राहूं शकत नाहीं "--- ( 'Every kingdom divided against itself is brought to desolation; and every city or house divided against itself shall not stand " ). याचकरता आपण दुसऱ्यांच्या सहिष्णुता व उदारमतवादीत्वाच्या भावनेला वश करून घेतलें पाहिजे कारण दुसऱ्याकडे---जें आपल्यापरीनें निःस्वार्थबुद्धीनें कार्य करीत आहेत त्यांचें विचार व पद्धति जरी वेगळीं असली तरी--आपण आपली सदिच्छा प्रगट करून त्याची मदत घेण्यातच काहीं तरी चिरंतन व चागलें साध्य होईल. तें ऐक्य--मग तें कोणत्याही प्रकारचें असो--त्या ऐक्यांतच सामर्थ्य आहे, आणि प्रेमाची भावना कार्यसिद्धीला मदतच करीत असतें '-- ( Strength - of what-ever kind - always lies in unity. And love invariably leads to achievement. )

साधुश्रेष्ट कबीरच्या मुलाचें किंवा त्याच्या शिष्याचें असें एक वचन आहे कीं, ' पंथ ही गुरूची कबर आहे '---( The sect is the mausoleum of the Guru. ) असें वाटतें कीं, अशा

कबरी पुष्कळ आहेत आणि जर त्या गुरूची त्याच्या पंथाभिमानी शिष्यवरानीं सांप्रदायिकतेच्या कबरींतून आपल्या अध्यात्मिकतेचा प्रसाद व आत्मसाक्षात्काराचा अनुभव याचा लोकांत सहिष्णुतेच्या व विश्वव्यापकत्वाच्या भावनेनें प्रसार करण्यास मोकळीक दिली तर फार उत्तम होईल. सामुदायिक जीवन परिणामकारक करण्यास्तव आपल्या भोवतालील जगाची सुधारणा करण्याचा प्रयत्न आपण कसा करावा ? हा एक प्रश्न आहे.

यद्यपि भारतीय किंवा अन्य जातिव्यवस्थेवर टीका केली तरी त्यावर प्रत्यक्षपणें प्रहार करावा असा मात्र त्यांत हेतु मुळींच नाही. पहिल्या प्रथम हिंदुस्थानांतील व पाश्चात्य देशांतील मानवी समाजाच्या मूलभूत घटनेविषयीं सामान्य जनतेच्या काय कल्पना आहेत त्याचें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न झाला पाहीजे. कोणत्याही संस्थेचें बाह्य स्वरूपांत बदल घडवून आणणें ही चुकीची पद्धति होय. प्रथमतः त्या संस्थविषयींच्या कल्पनामध्यें बदल घडवून आणला पाहीजे. नवीन ध्येय पुढें ठेवलें पाहिजे. जीवनांत बदल झाला पाहिजे. असें एकदा घडून आलें ह्मणजे बाह्यात्कारी सामाजिक स्वरूपांत आपोआप बदल घडून येतो. मग ते नवीन जीवनाच्या आकांक्षानुसार व विचारप्रवाहानुसार आपला जम बसवतात. आपल्या कालांत तर जीवनापेक्षां बाह्यस्वरूपाविषयींच बरेंच प्रयोग होत आहेत. आधुनिक कालांतील मानव अत्यंत उतावीळ झालेला दिसतो. योग्यकालापूर्वींच बाह्यात्कारी स्वरूपांत बदल घडवून आणण्याची त्याची फार इच्छा आहे. उदाहरणार्थ राजकीय क्षेत्रांतच कितीतरी क्रान्त्या घडून आल्या आणि प्रत्येक प्रसंगीं विशेष महत्वपूर्ण

असें कांहीच न घडता, थोड्याच कालात पुन्हां पूर्वस्थितीप्रत येऊन ठेपतें व ज्या काहीं अल्पशा सुधारणा होतात त्या जी सांस्कृतिक, सांपत्तिक व शारीरिक झीज सोसावी लागती त्या मानानें अगदींच क्षुल्लक ठरतात.

जर आपणाला लोकाना जास्त अध्यात्मप्रवण करावयाचें असल्यास आपण धार्मिक विधींत बदल घडवून आणूं का काहीं विधी याज्य ठरवून त्या जागी नवीन विधी चालू करूं ? तर असें मुळींच नाहीं. जर आपणाला लोकाना धार्मिक करावयाचें आहे तर त्याना अध्यात्मिक जीवनाचें जिवंत उदाहरण दाखवून त्याच्या हृदय-मंदिरातील धर्मज्योत पेटविली पाहिजे. आपण आदर्श उदाहरण घालून दिलें ह्मणजे पुरें. नवीन धार्मिक विधी किंवा संस्था तसा काल आला ह्मणजे आपोआपच प्रसृत होतील. त्याचवेळीं त्याचें तें कार्य करतील. त्या सर्वांचा घोटाळा करणें अगदीं निरर्थक होय. त्याचप्रमाणें आपण राजकीय किंवा सामाजिक सुधारणाचा घोटाळा करूं नये. जीवनाच्या प्रत्येक कार्यक्षेत्रात हाच नियम लागूं पडतो. अंतःकरणपूर्वकच बदल झाला पाहिजे ह्मणजे बाह्य स्वरूप आपोआपच बदलतें. हाच नियम मानवाच्या वैयक्तिक व सामाजिक जीवनाला लागूं पडतो. आणि जर मानसिक स्वरूपाच्या सामुदायिक गोष्टी धोक्यात असल्या तर त्यावेळीं कार्यकर्त्यांनीं अत्यंत काळजीपूर्वक व जागरूक रीतीनें काम केलें पाहीजे. ध्येयवादाच्या मार्गांत बऱ्याच अडचणी असतात. उदाहरणार्थ समतेचें ध्येय हे एक अशाच प्रकारचें अध्यात्मिक ध्येय आहे. बंधुत्वाप्रमाणें या समतेच्या तत्वावरच सामाजिक जीवन-राष्ट्रीय व अंतरराष्ट्रीय-

आधारलें पाहीजे हें खरें. परंतु समतेचा अर्थ मात्र राजकीय किंवा सामाजिक दृष्टीनें विपरीत केला जाईल व त्याचें वाईट परीणाम भोगावें लागतील. याचा विचार पुढील प्रकरणात येणारच आहे.

उच्चप्रकारच्या सामाजिक कार्यकर्त्यानें आपलीच मनोवृत्ति सामुदायिक मनोवृत्तींत आहे असें मानण्याची चूक करूं नये किंवा दुसऱ्या शब्दात असें ह्मणता येईल कीं, लोक आपल्या इतकेंच सुज्ञ व स्वार्थत्यागी आहेत अशी कल्पना करून घेणेंही चुकीचें आहे. तो स्वतः अत्यंत उज्ज्वल वृत्तीचा व चारित्र्याचा असावयास पाहिजे, ही पहिली गोष्ट; दुसरी ह्मटली ह्मणजे तो लोकातीलच एक असावयास पाहिजे, त्याच्या मनाचा चागला अभ्यास केला पाहिजे व त्याचें काय काय दोष आहेत याचेही सूक्ष्म अवलोकन केलें पाहिजे. कारण सामान्य जनतेतील लोकाचें मन मन्दगतीनें कार्य करीत असतें. त्याना भावना असतें पण विचार नसतो. कार्यकर्त्यानें ही गोष्टही लक्ष्यात बाळगली पाहिजे. "— "( A social leader of the nobler type must not commit the mistake of projecting his own psychology into the collective psychology, or in other words, imagining the people to be as intelli - gent and unselfish as himself. He must first of all deeply and gloriously be himself, but secondly, he must be one of the people, know them thoroughly and realise their limitations. The mind of the people works slowly. They feel, but do not think much. ) असें झालें नाही तर लोकातून समूहनिष्ट माणसें दुष्ट पुढाऱ्याच्या

नेतृत्वाखालीं बरेंच तयार होतील. सामान्य जनता अपायकारक असतें ( Messes are dangerous ). अशाप्रसंगीं खरा सत्यनिष्ट ब्राह्मणच मार्गदर्शकत्व स्वीकारावयासाठीं आला पाहिजे - पक्षाचें पुढारी जे अपुरें पडतात अशाचें हे काम नव्हें. सामुदायिक मनावर स्थीरपणानें छाप पाडून, समूहाच्या अज्ञात स्थितींतून त्याना बाहेर काढून त्याच्या समाजपरिपोषक वृत्तींना चालना देणें व लोकमताला योग्य वळण देणें इत्यादि पद्धतीनींच सामाजिक सुधारणा घडवून आणणें हें अत्यंत उत्कृष्ट होय. तत्त्वदृष्टया हें अगदीं सोपें दिसतें परंतु आचारात आणण्यास नेहमीं-प्रमाणेंच अवघड ठरतें. तरीपण एकदा तत्त्वाला सत्य स्वरूपाचें व सुलभ ह्मणून मान्यता मिळाली ह्मणजे मग त्याच्या तपशीलाला सुद्धा आपोआप ओघानेंच मान्यता मिळते. हाच नियम उत्कृष्टपणें लागू पडतो.

समाजाच्या मनावर कशी छाप पाडावी या विषयींच्या साधनांची माहिती प्राचीन स्फूर्तिदायक चिनी धर्मग्रंथातून सापडते. आयजिंग ( I-Ging ) ( Book of Commutation ) या विचारपूर्ण पुस्तकातून कांहीं विचार उध्दृत करणें आवश्यक आहे. हा ग्रंथ अत्यंत प्रगल्भ विचाराचा व चिरकालस्वरूपाचा आहे. ५७ व्या चिन्हात ( Sign ) असें ह्मटलें आहेः— " सूक्ष्मावलोकनानें सावकाशपणें सूक्ष्म परिणाम घडून येतात. हे अत्याचारानें घडवून आणावयाचें नसून छाप पाडण्याच्या अविरत कृतीने घडवून आणावयाचें असतात. अशाप्रकारें झालेल्या परिणामाकडे जनतेचें त्याचा मनोभंग किंवा खंडन करून घडवून आणलेल्या परिणामापेक्षा फारच थोडे लक्ष जातें व

असें असूनही पूर्वप्रकारें घडलेलें परिणामच टिकाऊ व परिणामकारक ठरतात. अशाप्रकारें कार्य करण्याकरता आपलें ध्येय काय हें ठरविणें अत्यंत आवश्यक आहे. कारण एका विशिष्ट ध्येयानें प्रेरित होऊन जर काहीं प्रभावी छाप पाडण्याचें कार्य सतत केलें तरच कांहीं तरी साध्य होईल हें खास. . . ... ....

'मनाच्या सूक्ष्मावलोकनाचा गुण हा मनाच्या एकात्मकते मुळेंच आहे. यामुळेंच तें इतकें प्रभावी ठरतें. तें साध्य साधण्यासाठीं कालाचा साधन म्हणून उपयोग करतें. त्याचप्रमाणें शासकवर्गाचे विचार समाजाच्या मनावर चांगले बिंबले पाहिजेत. याकरता सतत विस्तारपूर्वक विवेचन व उपदेश याची आवश्यकता असते. एकदा उपदेशाचा समाजावर परिणाम झाला म्हणजे मग तो उपदेश आचारांत येणें शक्य होतें. बेसावधपणें लादलेला आचार लोकांना धक्का देतो व त्यायोगें लोकांची सहानुभूति नष्ट होते. ( Penetration generates gradual and subtle effects. It should not be brought about by violence but by uninterrupted influencing. These effects attract less general attention than those won by infraction, but they are more persevering and deeper. In order to be able to work in this way, it is essential clearly to realise one's end for something will be attained only if the penetrative influencing is continually going on in the same direction. 'The penetrative quality of the mind is due to its incessancy. That makes it so powerful. It uses time as means to the effect. Similarly the thought

of the ruler has to penetrate into the social mind. To that effect a continuous influencing through elucidation and injunction is required. Only when the injunction has entered the social mind, a corresponding course of action is possible. Unprepared action scares people and works alienating. )

या प्राचीनकालीन सुबुद्ध व उत्कृष्ट विचारसरणींत आधुनिक कालीन सामाजिक समाजशास्त्रास काहीं भर घालावयाची नसून त्याला ते पूर्णपणें मान्यता देत आहे.

यात विशेष महत्वाची गोष्ट ही आहे कीं, लोकाच्या मनावर अशाप्रकारें छाप पाडावयाची कीं, लोकाना कळूं देखील नये. लोकाना पंतोजी प्रमाणें पाठ देण्याची आवश्यकता नाहीं, किंवा सध्या फॅसिस्ट राष्ट्रांत चालल्याप्रमाणे त्याना कोणते कोणते मान्य करा, कशावर विश्वास ठेवा किंवा राजकीय दृष्ट्या काय करा असेही सागावे लागत नाहीं. याच कारणास्तव आयर्जीगमध्ये म्हटलें आहे कीं, सामाजिक मनांवर छाप पाडून घडवून आणलेल्या परिणामाकडे जनतेचें त्याचा मनोभंग करून घडवून आणलेल्या परिणामापेक्षा फारच थोडें लक्ष जातें व असें असून तेच परिणामीं टिकाऊ ठरतात. खरे कार्यकर्ते या खऱ्या मार्गानें कार्य करतात, परंतु सर्वाधिकाऱ्याचा मार्ग मात्र याच्या उलट.

लओ-झेच्या ते-तेह-चिंग या ग्रथातील काहीं उदाहरणें देणें आवश्यक आहे. तो म्हणतो :– " प्रत्येक गोष्ट आपल्यापरी घडूं देण्यानेंच साम्राज्ये जिंकली जातात. जो काहीं तरी करीत असतो तो साम्राज्य कमावण्यास अयोग्य ठरतो. कांहीं तरी करणें म्हणजे बाह्यात्कारीं

बदल घडवून आणणें होय. जर राजेलोक या तत्त्वाप्रमाणें वागतील तर त्याच्या मनाप्रमाणें सर्व सुधारणा आपोआप घडून येतील. तेओ(Tao) ह्मणजे सत्याचा आणि खऱ्या व सत्यज्ञानी ब्राह्मणाचा मार्ग होय.

( The empire has ever been won by letting things taking their course. He who must always be doing is unfit to obtain the Empire. "Doing" that is, trying to change outer forms No, it is necessary to follow the course of Tao· "If kings and princes could but hold fast to this principle, all things would work out their own reformation." Tao is the path of truth, the path of the Brahman or 'knower of truth'. )

नैसर्गिक स्थितींत' सुवर्ण युगाप्रमाणें' लोकाना आपल्यावर राज्य केलें जात आहे हें माहीतच नव्हतें. लेओझे म्हणतो, " फार प्राचीन कालीं लोकाना आपल्यावर राज्यकर्ते आहेत हें ज्ञात नव्हते. त्याच्या पुढील युगात त्यानीं राजावर प्रेम केलें व त्याची स्तुति केली. याच्यापुढें ते त्याना भिऊं लागले. त्यापुढें त्याचा ते द्वेष करूं लागलें. ( In the highest antiquity, the people did not know that they had rulers. In the next age they loved and praised them. In the next, they despised them. ")

एकंदरीत लेओझेनें एकतंत्री राजसत्तेचा उदय कोणकोणत्या अवस्थातून झाला हे थोडक्यांत सागून टाकलें आहे. या चार अवस्था-मध्यें ग्रीक व हिंदु लोकांच्या परंपरेचा उल्लेख आहे. सध्या पुष्कळ

देशामध्यें कांहीं ठिकाणीं लोकसभा ( Parliaments ) कांहीं ठिकाणीं मंत्री ( Ministers ) किंवा कांहीं ठिकाणीं ज्याना लोक भितात असें सर्वाधिकारी ( dictators ) इत्यादि सर्व प्रकारच्या राज्यसंस्थेचा द्वेष केला जात आहे. आपणाला लोकांना न कळणाऱ्या राज्यसंस्थेसारख्या मूळ राज्यसंस्थेकडे वळलें पाहीजे. ह्मणजे जेव्हां हें कार्य यशस्वी होईल व सर्वत्र भरभराट होईल तेव्हां सर्व जनता ह्मणेल कीं, ' आपण नैसर्गिक रीतीनें आपणहूनच पूर्वीं होतो तसेंच आहोंत ' ( लेओझे ). खरें राज्यकर्ते जर कोणी असतील तर ते उच्चवर्णीय लोकच, कारण तेच समाजाचें पुढारी, खरे द्रष्टे, खरे शिक्षक, व खरे मार्गदर्शक असतात. ब्राह्मण, सरदार घराण्यांतील लोक व इतर लोक जे जीवनाच्या उदात्त भूमिकेवर राहूं शकतात अशा लोकांनीं तसें राहण्याचा प्रयत्न करावा. खऱ्या सरदाराचें जीवन कसें असतें या विषयीं लेओझे ह्मणतो, "जो लोकाच्यावर वर्चस्व प्रस्थापूं इच्छितो त्यानें आपल्या भाषणानें विनयशील अशा खालच्या थरावर रहावें, पुढें येणाऱ्याने नेहमीं त्याच्या मागें असावें. अशा रीतीनें तो जरी लोकांच्या वर प्रभुत्व गाजवीत असला तरी त्यांना ते भासमान होत नाहीं; तो जरी त्यांच्यापुढें असला तरी त्यांना तो अपमान वाटत नाहीं. म्हणून सर्व मानवजात त्याला डोक्यावर घेऊन नाचते, व त्याचा तिरस्कार करीत नाहीं. खराज्ञानी जो असतो त्याला तो जे काय करतो त्याला मान्यता मिळतें कीं नाहीं याबद्दल तो निष्काळजी असतो; तो कीर्ति संपादन करतो पण तो स्वतांला लागूंच करीत नाही; तो आपली किंमत कोणाला दाखवूं इच्छित नाहीं. तीन फार अमोल्य गोष्टींना मीं

फार किंमत देतो व त्याच्यावर माझा दृढ विश्वास आहे. पहिली मृदुलता ( gentleness ), दुसरी मितव्ययीपणा ( frugality ) व तिसरी दुसऱ्यांच्या पुढें पुढें करू न देणारी विनम्रता ( humility ). सौम्य रहा ह्मणजे तुह्मीं धीट होऊं शकाल, मितव्ययी बना ह्मणजे उदार व्हाल, दुसऱ्याच्या पुढें पुढें येण्याचें टाकून द्या ह्मणजे तुह्मीं पुढारी व्हाल. अलिकडे मात्र सर्व उलट. मृदुता मोडून नुसते धीट बनतात, काटकसरीला दोष देऊन उधळपट्टी मात्र करतात, विनम्रतेचा त्याग करून अग्रस्थानीं येण्यासाठीं धडपड व खटपट करतात, आणि ह्मणूनच अयशस्वी व अपयशी ठरतात."

"जो दुसऱ्याना ओळखतो तो हुशार पण जो स्वताला ओळखतो तो खरा सुविद्य. जो दुसऱ्यावर विजय मिळवितो तो तर शक्तिमान् परंतु जो स्वतावर जय मिळवितो तो त्याच्याहीपेक्षा अधिक सामर्थ्यसंपन्न होय" !

"जगांत जलासारखी मार्दवयुक्त व अगदी हलकी वस्तु नाहीं, तरी पण कठीण पदार्थांना फोडणारें त्याच्यासारखें दुसरें हत्यारच नाहीं व त्याच्यापेक्षा अधिक प्रभावी असें दुसरें काहींच नाहीं. अत्यंत मृदु वस्तु अत्यत कठीण वस्तुचा भेद करते, त्याचप्रमाणें अत्यंत सामान्य मनुष्य मोठमोठ्याना नमवितो." आणि ह्मणूनच उच्चवर्णीय लोक सामान्य जनतेवर मात करतील व मानवाच्या जीवितनौकेचे कर्णधार बनतील.

इतिहासपूर्वकाळीं या पृथ्वीतलावर मांसाहारी राक्षस, असुर व इतर वन्य पशू यांचाच स्वैरसञ्चार होता. ते सर्व आपापसांतच एकमे-

कांचें बळी घेऊं लागलें व अशा रीतीनें शेवटीं समाजप्रिय व निरागस अशा साध्या व छोट्या शाकाहारी मानवाकडे पृथ्वीचें स्वामित्व आलें. पुढील युगात मांसाहारी व वन्य लोकांची जात निःशेष झाली व राहिलेल्या मानवाचें वंशज सर्व जगतिलावर निरनिराळ्या स्वरूपात पसरलें गेलें. याच्या पुढील युगांत इतिहासाची पुनरावृत्ति झाली, हिंस्त्र व्याघ्र, गुहेंतील अस्वल आणि इतर राक्षसवर्ग शाकाहारी प्राण्यांवर चाल करून गेला, परंतु शेवटीं समाजप्रिय मानवानेंच शर्यत जिंकली. आता जे वाघ किंवा सिंह शिल्लक आहेत ते पूर्वीच्या त्याच्या पूर्वजांच्या मानानें बरेंच माणसाळलें गेलें आहेत.

मानवजातीच्या इतिहासासही तो नियम लागू पडतो. पाशवी शक्ती अंतिम अवस्थेंत आत्मविनाशी ठरते कारण ती विभक्त व स्वतंत्र अशा व्यक्ति किंवा संघामध्यें असतें व हेंच संघ कालाच्या ओघात आपापसांत कलह करून नष्ट होतात, व शेवटीं साध्या व सज्जन लोकांकरताच कार्यक्षेत्र मोकळें राहतें. शेवटीं पुन्हा लेओत्झेकडे वळूं. तो ह्मणतो, " मानवश्रेष्ट जो असतो तो अंतःसामर्थ्यावर जोर देतो व बाह्यशक्तीकडे लक्ष देत नाहीं; तो विषयलक्षी न बनता आत्मलक्षी बनतो." ( The sage attends to the inner and not to the outer, he puts away the objective and holds to the subjective. ) दुसऱ्या शब्दांत असें ह्मणता येईल कीं, तो बाह्य रूपाकडे लक्ष न देतां विचार व जीवन यांतच प्रथमतः बदल घडवून आणतो व त्याची कार्यपद्धति अशी असतें कीं, 'मानवामध्यें कोणाचाही अव्हेर करावयाचा नाहीं, कोणत्याही गोष्टीमध्यें कशाचाही तिरस्कार

करावयाचा नाहीं, यालाच ह्मणतात 'व्यापक बुद्धिमत्ता'— ( " Among men, reject none ; among things reject nothing. This is called comprehensive intelligence.)

हाच एक राजमार्ग आहे, ज्यायोगानें चिरकालीन परिणाम घडवून आणतां येतात. हा मार्ग उदारमतवादित्वाचा आहे—जो असहिष्णुतेला मार्गे सारतो—व याच कारणास्तव हा विश्वबंधुत्वाचा मार्ग आहे—( The path of universal brotherhood.)



प्रकरण ३ रें.

# राष्ट्रीयता व अंतरराष्ट्रीयता

वर्णसंकराच्या विषयाला धरूनच असलेला असा राष्ट्रीयता व अंतरराष्ट्रीयता हा विषय मनोरंजक आहे. या विषयाचें मार्गदर्शकत्व स्वीकारणाऱ्या अशा राजकारणी लोकांनाही या दोन्हीमधील संबंध क्वचित्च अवगत होतो. * सध्या जगतामध्यें असें कांहीं विचारप्रवाह प्रचलित आहेत कीं, जे राष्ट्रीयता ह्मणजे मानव्याचा पूर्ण आविष्कार असें प्रतिपादन करतात. यांच्या मतानुसार राष्ट्रानें आपण इतर राष्ट्रापेक्षा प्रत्येक बाबतींत श्रेष्ट आहोत हें दर्शविलें पाहिजे, त्यांतील लोक उदात्त विचाराचें असावेत, शारीरदृष्ट्या सामर्थ्यसंपन्न व सौंदर्ययुक्त असावेत, अत्यंत बुद्धिमान्, कलात्मक, तात्विक असे असावेत. थोडक्यात प्रत्येक गोष्टींत अधिक गुणवान् व श्रेष्ट असावेत ही इच्छा. यालाच धरून प्रत्येक राष्ट्राला आर्थिकदृष्टया स्वसहाय्यक व स्वयंपूर्ण असावें असें वाटतें. हें आर्थिक स्वातंत्र्यरूपी एक बंड

---

* "आज राष्ट्रीयतेचा जो इतका जिकडे तिकडे प्रसार झाला आहे ती फक्त पक्षाभिनिवेशयुक्त राष्ट्रीयता होय. आणि एकाच देशांत त्याचे विविध प्रकार दृष्टीस पडतात. स्पेनमध्यें सध्यां दोन प्रकारचे राष्ट्रीयपक्ष आपापसात युद्ध करीत आहेत. खरी राष्ट्रीयता ही सांस्कृतिक असून पक्षाभिनिविश–विरहित असतें."

आहे ( The tumour of autarchy ). या विचारसरणीमुळें अंतरराष्ट्रीयतेला निंदास्पद ठरविलें गेलें, कारण तिचें सत्यस्वरूप उमजलें नाहीं व तिचा राष्ट्रीयतेचा अतिरेक ( Supernationalism ) असा अर्थ केला गेला.

अशा विचाराच्या राष्ट्रांतील विचारी लोकांच्या असें प्रत्ययास येईल कीं, राष्ट्रीयतेचें खरें वैभव प्रत्येक राष्ट्राने आपल्यापरीनें आपली विशिष्ट व अनुकरणीय संस्कृति, विशिष्ट सौंदर्य, आपलें विचारप्रवाह, शास्त्रीय शोध आणि आर्थिकदृष्ट्या आपल्या देशाच्या विशिष्ट हवापाणी, व निसर्गसंपत्ति यांच्या सहाय्याने मोईस्कर रीतीनें स्वस्तदरात पुष्कळ येणारी धनधान्यें इत्यादी गोष्टींची जगाला देणगी देणें यातच आहे.

वास्तविकपणें या भ्रांत राष्ट्रीयतेनें (mistaken nationalism) पूर्णपणें प्रकट होणाऱ्या व स्वयंपूर्ण अशा आकांक्षा इतर राष्ट्रांना अनुकरणीय वाटतात परंतु ही कृति मात्र मानवाला अनुचित आहे. एकंदरींत असें करणें ह्मणजे एकाच कुटुंबांतील प्रत्येक व्यक्तीनें आपापली सर्व व्यवस्था - ह्मणजे स्वयंपाक किंवा कपडेलत्ते सर्व स्वतंत्र ठेवणें अशा मार्गोंत आहे. श्रमविभाग, वेळ, शक्ती व मालमसाला इत्यादि गोष्टींची काटकसर करण्यात वैयक्तिक आवडीच्या ज्या संस्कृति व प्रगति इत्यादि गोष्टी त्याना सुद्धां आड केलें जातें, अशा करण्यांत व्यवहारज्ञानाला कोठें स्थान आहे. ?

खरी अंतरराष्ट्रीयता म्हणजे राष्ट्रीयतेचा अतिरेक नव्हे. किंवा राष्ट्रीय वृत्तिच्या आविष्काराला प्रतिबंधक अशी गोष्ट नव्हे, तर एक वेगवेगळ्या राष्ट्रांतील व वंशातील बंधु-भगिनींना ऐक्याच्या सूत्रांत गुंफणाऱ्या

हृदयाची भाषा आहे. आणि जगात उत्पन्न होणाऱ्या मालाच्या परस्परगतील अंतरराष्ट्रीय करारान्वयें किंवा अंतरराष्ट्रीय संघाच्या द्वारें त्या मालाचा खुला व्यापार ही एकप्रकारची आर्थिक देणगीच आहे.

ज्या चुकीच्या अंतरराष्ट्रीयतेमुळे हिंदुस्थान व इतर पौर्वात्य राष्ट्रें पाश्चात्याच्या जीवनाचें व विचाराचें अनुकरण करूं लागली ती वास्तविक अंतरराष्ट्रीयताच नव्हे. निसर्गनियमानुसार हें अंधानुकरण असून ती एक प्रकारची फॅशनच होय. फार थोड्या उदाहरणात योग्य जुळणी साधली आहे – ( Only in a few cases it is adaptation .). उपयुक्त गोष्टींची सुसंगत जुळणी हें बुद्धीचें लक्षण होय. परंतु अनावश्यक गोष्टींचें अंधानुकरण हे राष्ट्राच्या अज्ञानाचें, न्यूनगंडत्वाचें, व बौद्धिक गुलामगिरीचें द्योतक होय. योग्य जुळणी किंवा अनुकरण हा राजकीय सत्तेचा परिणाम नव्हे, कारण आशियाखंडातील जपान व तुर्कस्तान या स्वतंत्र राष्ट्राचे गुलामगिरींतील देशापेक्षा जास्त प्रमाणात पाश्चात्यीकरण घडून आले आहे. जपान व तुर्कस्तान या राष्ट्रामध्यें ज्या पाश्चात्य वळणाच्या काहीं सुधारणा दृष्टीस पडतात त्या फार अक्कलहुशारीनें व राष्ट्राला हितकर होतील अशा दृष्टीनें घडवून आणल्या गेल्या. तथापि इतर काहीं बाबतींत ( पोषाख, जीवन व्यवहार, विचार आणि इतर शिष्टाचार इत्यादि ) जे पाश्चात्य वळण लागलें गेलें तें राष्ट्रीय परंपरेच्या उज्वलतेला कालिमा आणणारे असें पाश्चात्याचें अंधानुकरण होय असें मात्र वाटत नाहीं.

ज्याप्रमाणें पाश्चात्य देशात पौर्वात्य लोक पाश्चात्य पोषाखाचा स्वीकार करतात, त्याप्रमाणेंच आशियामधील पाश्चात्य लोक वैयक्तिक

व सामाजिक कारणास्तव पौर्वात्य पद्धतीचाच पोषाख करतील तर बरें. शंभर वर्षांपूर्वीं काहीं युरोपिन लोक धोतर व इतर कपडे वापरीत असलेले आढळत. जर युरोपियन लोकांनीं त्यांच्या या पूर्वजाप्रमाणें हवामानाच्या दृष्टीनें सोईस्कर असा पोषाख करण्यास सुरवात केली तर त्यांच्या विषयीचा आदर कमी न होता त्यांच्या प्रतिष्ठेंत भर पडेल. सध्याही क्वचित् कोणीतरी असा असेलही. जर मोठया प्रमाणात असें घडून आलें तर जातिवैमनस्याला बराच आळा बसेल.

याच्या उलट प्रकार अफगाणिस्थानात झाला. पुरोगामी वृत्तीचा राजा अमानुल्ला यानें ज्यावेळीं जनतेला पाश्चात्यांच्या अनावश्यक गोष्टींचें अनुकरण करण्यास भाग पाडलें त्यावेळीं लोकांच्या राष्ट्रीय मनोभावनेला जोराचा धक्का बसला. हीच मनोवृत्ती त्याच्या अधःपातास कारणीभूत झाली, कारण त्यानें आवश्यक गोष्टीकडे काळजीपूर्वक लक्ष दिलें नाहीं.

पाश्चिमात्य राष्ट्रांतही काहीं लोक असें आहेत कीं जे पौर्वात्य जीवनपद्धतिचा व विचारपद्धतिचा अवलंब करतात. अंधानुकरण मात्र हास्यास्पद ठरतें व त्याची कींव येतें. जर पूर्ण परंपराभिमानी व ‘ जुनें तें सोनें ’ या तत्त्वाचा पुरस्कार करणाऱ्या परिस्थितींत सोईस्कर व श्रेयस्कर असें सुसंगत अनुकरण केलें गेलें तर त्याचें कौतुकच केलें जाईल.

आता प्रस्तुत विषयाकडे वळूं. खरी राष्ट्रीयता व खरी अंतरराष्ट्रीयता या दोन भिन्न नसून एकच गोष्टीच्या दोन बाजू आहेत. मानवाला जवळचें असें राष्ट्रीयत्वच आहे व ह्मणून तें प्रथम येतें.

याच्यांतही शहराविषयीच्या किंवा प्रांतिक स्वरूपाच्या स्थानिक राष्ट्रीयत्वाचा प्रथम अंतर्भाव होतो. व्यावहारिक दृष्टीनें पाहिलें तर आपण ज्या स्थळीं ज्या स्थितींत आहोत तेथील कार्य जर आपण योग्यप्रकारें पार पाडलें तर आपण अंतरराष्ट्रीयदृष्ट्या देखील उपयुक्त ठरूं. ज्याप्रमाणें व्यक्ती ही समाजांत अंतर्भूत असतें, त्याप्रमाणेंच राष्ट्रीयता अंतरराष्ट्रीयतेंत अंतर्भूत आहे. येथें व्यक्तीलाच प्राधान्य मिळतें कारण समाजाला व्यक्त स्वरूपाला आणण्यास तीच मदत करतें; नाहीं तर व्यक्तीशिवाय समाज ही एक अमूर्त कल्पनाच ठरेल. संस्कृतिची निर्मिती हें व्यक्तीचें व राष्ट्रीयतेचें कार्य आहे, परंतु समाज व अंतरराष्ट्रीयता हें स्फूर्तिचे झरें होत व याचमुळें त्याचा पूर्ण फायदा त्याना मिळूं शकतो.

जग हें अष्टपैलू हिऱ्यासारखें आहे. प्रत्येक पैलूच्या सौंदर्यांत इतर पैलूंतील तेजाच्या परावर्तनानें भर पडतें. जर एकच पैलू स्वतंत्रपणेंच प्रकाशूं लागेल व इतर पैलूंची जागा दुसऱ्या कोणत्या तरी वस्तुनें भरून काढणें शक्य झालें तर त्या पैलूचेंच तेज नष्ट होईल. सद्य:स्थितींत हीच गोष्ट काहीं राष्ट्रें करूं पाहात आहेत—

( The world is as a big diamond with many facets. Each of the facets derives beauty from the reflection of the other facets. If one facet would wish to shine by itself and succeed in getting all other facets covered with some substance, it would lose its own lustre. Such, indeed, some nations are trying to do at the present time.

आपण असल्या स्थळींच राष्ट्रीयतेच्या आविष्कारास व कार्यास प्रारंभ होतो असें मी पूर्वीं ह्मटलेंच आहे. याचें निश्चित स्वरूप असल्यास या आविष्कारास सुद्धा कांहीं मर्यादा घातल्या पाहिजेत. आपण एक उदाहरणच घेऊं :— मी बंगालला जाण्यापूर्वीं बंगाली लोकांच्या प्रांताभिमानाविषयीं बऱ्याच गोष्टी ऐकल्या होत्या. मीं जेव्हा तेथें गेलों तेव्हा असें कळून आलें कीं, बंगाली लोकांना आपण उत्कृष्ट हिंदी बनण्याकरता प्रथम उत्कृष्ट बंगाली बनलें पाहिजे याची पूर्ण जाणीव होती. पहिल्या प्रथम उत्कृष्ट बंगाली, उत्कृष्ट हैसुरी किंवा उत्कृष्ट मराठा बनणें याशिवाय उत्कृष्ट हिंदी बनण्याचा दुसरा कांहीं मार्ग आहे का ? हिंदी मनुष्याचें वर्णन कसें करणार ? हे शक्य आहे कां ? सर्व सामान्य सिद्धांत मात्र कुच किंमतीचे आहेत. हिंदु व मुसलमान संस्कृतिचे मूलभूत सिद्धांत आणि भौगोलिक व राजकीय एक केंद्र याबाबतींतच हिंदुस्थानला मान आहे. राष्ट्रीय आदर्श ह्मणून त्याला सत्यत्व प्राप्त होऊं लागलें आहे. एकंदरींत राष्ट्रीय वृत्तीचा परिपाक होत आहे ही समाधानाची गोष्ट आहे. या उच्च दृष्टीमुळें स्थानिक मनोवृत्तीला उत्तेजन मिळेल, कारण खऱ्या संस्कृतिचें व प्रगतिचें उगमस्थान तेंच आहे.

या तऱ्हेची मनोवृत्ती आपणाला हिंदुस्थानी लोकांच्या स्थानिक दळणवळणांत दिसून येतें, आणि हेंच योग्य होय कारण तें सर्व शुद्ध, सत्य व नमुनेदार असतें. अर्थात् हें तत्त्व तुह्मीं मलबारमधील कथाकाली नांवाच्या नृत्ययुक्त नाटकाला किंवा एकाद्या पवित्र क्षेत्रांतील धार्मिक मिरवणुकीला, किंवा बंगालमधील ब्रटाचारीचें नर्तनाला लागूं करून पाहा. अलिकडील कार्यक्रमापैकीं शेवटचा मला

फार पसंत पडला. या कार्यक्रमात प्राचीन बंगाली संस्कृतीचें भांडार साठविलें असून तो जिवंत व अभिजात स्वरूपाचा आहे. याचा लौकिक यातच आहे कीं, हा उपक्रम स्त्री व पुरुष या दोघांकरताही असून तो फक्त रंगमहाल किंवा रंगभूमिकरता तेवढाच नाहीं. मला आशा आहे कीं अशा प्रकारच्या संघाची स्थापना इतर प्रांतानही होईल; अर्थात् ते मग ब्रताचारीचीच नक्कल म्हणून नव्हे तर इतर प्रकारच्या स्थानिक सांस्कृतिक परंपरेला नवीन जीवन देणारें अशा प्रकारचें पाहिजेत. प्राचीन इतिहासातील काहीं वैशिष्ट्ययुक्त गोष्टींचें पुनरुज्जीवन व त्याचा उपयुक्त प्रचार झाल्यास ते स्फूर्तिदायक व जीवनाला चैतन्यदायक ठरेल. प्राचीन परंपरेच्या पायावर नूतन जीवनाचा प्रासाद बांधण्यासारखें श्रेयस्कर असें काहीं नाहीं. ज्या गोष्टी परकीय असल्यामुळें या भूमींत रुजत नाहींत, त्याच्यापेक्षा येथील गोष्टीच फार कल्याणप्रद ठरतात.

मी ब्रताचारीच्या उपक्रमाचें उदाहरण एकाच्याच नेतृत्वाखालीं राष्ट्रीय भावनेच्या आविष्काराला कसा प्रारंभ होतो व तो पुढें त्याच्यापासून इतर त्याच्या शिष्याच्या प्रचारानें कसा सारखा वाढत राहतो हें दर्शविण्याकरताच दिलें. याबद्दलचा अभिमान राष्ट्रीयत्वाचा संकुचितपणा दर्शवीत नाहीं, उलट हिंदुस्थानच्या संस्कृतींत एक प्रधानस्वरूपाची भरच आपण टाकीत आहोत या भावनेचाच अभिमान त्यात आहे व याच दृष्टीनें एकंदर जागतिक संस्कृतींत सुद्धा भर टाकली जातें. या दृष्टीनें हें अंतरराष्ट्रीयच ठरतें.

राष्ट्रीय आणि स्थानिक भावनेच्या आविष्कारावर जोर देताना हें विसरता कामा नये कीं, या कार्याला परकीय राष्ट्रातूनही स्फूर्ति मिळत असतें, व या स्फूर्तिला आपण आपल्या राष्ट्राच्या भावनेनुसार योग्य वळण देऊन त्याचा उपयोग करून घ्यावा. ऑरटेगा गॅसेट ( Ortega Gasset ) ह्मणतो कीं, " जर एकाद्यानें ' राष्ट्रीय मानव' ( national being ) ह्मणून अगदीं आलिप्त राहण्याचा प्रयोग करून पाहिला व जर त्यानें इतर देशापासून जे कांहीं घेण्यासारखें आहे तें एका सर्वसाधारण फ्रेंच माणसाच्या उदाहरणावरून घेतलें तर त्याला धक्का बसेल व हें कळून येईल कीं, आपण मिळविलेल्या राष्ट्रीय गोष्टींवरच आपणाला जीवन कंठणें शक्य नाहीं, कारण त्यामुळें त्याला एकपंचमांशच भाग प्राप्त झालेला असतो." हेंच तत्त्व हिंदुस्थानलाही लागू पडतें. जर एकाद्यानें शंभर टक्के बंगाली नसलेल्या गोष्टींचा स्वीकार केला तर त्यालाही असें कळून येईल कीं आपणांला अद्याप हिंदुस्थानांतीलच आसामसारख्या इतर प्रांतांतील व युरोपसारख्या दूरच्या देशांतील कितीतरी संस्कृतिला पोषक अशा गोष्टींचा स्वीकार करावयाचा आहे. यावरून बंगाली संस्कृतिची प्रतिष्ठा कमी होईल असें मात्र नव्हे. कारण शंभर टक्के बंगाली कार्य तें विश्वव्यापक व नैसर्गिक कार्य ह्मणूनच गणलें जाणार. " ज्याप्रमाणें एकाद्या व्यक्तीवर भोवताlच्या परिस्थितीची छाप पडतें, व तिचें व्यक्तित्व ती व्यक्ती व तिच्या भोवतालचें भौगोलिक व मानसिक स्वरूपाचें परिस्थितीचें प्रवाह यांच्या क्रियाप्रतिक्रियात्मक झगड्यातूनच निर्माण होतें, त्याचप्रमाणें राष्ट्राचें राष्ट्रीयत्व राष्ट्रीय विचारप्रवाह व परराष्ट्रीय भौगोलिक व मानसिक स्वरू-

पाचें प्रवाह यांच्या क्रियाप्रतिक्रियात्मक झगड्यातूनच निर्माण होतें. राष्ट्रीय भावना जर सुप्तावस्थेंत असेल तर तें राष्ट्र इतराचें अंधानुकरण करील; जर जागृतावस्थेंत असेल तर तें राष्ट्र आपल्याला हितकर व कल्याणप्रद होईल अशाच दृष्टीनें व विशिष्ट मार्गानें इतराच्या विशिष्ट गोष्टींचें ग्रहण करील—( " As an individual is deeply influenced by his surroundings, and is a product of the interplay of his own personality and the forces around it — psychic and physical, so a nation is the product of the interplay of the national genius and the psychic and physical forces from abroad. If the national genius is asleep however, the nation will sheepishly imitate; if it is awake, the nation will adapt foreign influences and mould their expression in its own special way. ) "

एखादा मानव जरी या गोष्टींचा कर्ता किंवा निर्माता असला तरी त्याला जी स्फूर्ति मिळतें ती अंतःकरणात असलेल्या सामुदायिक व अज्ञात भावनेकडूनच, ह्मणजे त्याच्यातील मानवतेच्या नैसर्गिक भावनेकडूनच मिळतें. हेंच तत्त्व वैयक्तिक स्वरूपाच्या राष्ट्रांना लागूं पडतें. एकंदरींत व्यक्तीकडेच संस्कृतिचें नेतृत्व येतें व प्रगति हें तिच्याच प्रयत्नांचें फळ होय. याच दृष्टीनें जागतिक संस्कृतींत भर घालणारें राष्ट्रीयत्व खरें ठरतें. ज्यामध्यें सरहद्दींचा लोप होईल व उथळ अतिराष्ट्रीयत्वानें एकता उत्पन्न होईल अशी अवस्था कल्याणकारक ठरणार नाहीं.

एकंदरींत राष्ट्रीयता व अंतरराष्ट्रीयता या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. खऱ्या राष्ट्रीयतेंतील आत्मसाफल्य ही जागतिक संस्कृतीला एक देणगीच होय. विकृत राष्ट्रीयता आणि राष्ट्रीयतेचा अतिरेक ही अंतरराष्ट्रीय वर्णसंकरच दर्शवितात— ( Thus true nationalism and true internationalism are two sides of one coin. Self-fulfilment in true nationalism is the contribution to the world culture. Mistaken nationalism and supernationalism, however, denote an international confusion of natural classes.)



## प्रकरण ४ थें

# क्रान्तीचें स्वरूप

मागील विचारप्रवाहाच्या ओघातच प्राचीन व अर्वाचीन क्रान्तींचा विचार करणें योग्यच ठरेल. प्राचीन कालांत क्रान्तीचें शस्त्र एखाद्या दुष्ट राजाच्या विरूद्ध चालविलें जाई. अशा क्रान्त्या ह्मणजे वर्णसंकराविरुद्ध लोकांच्या निषेधात्मक चळवळीच होत. कारण अनिष्ट मानव अत्युच्च सिंहासनावर विराजमान होत असे. ही वैयक्तिक बाब होती. अलिकडे तर राजसंस्थेविरूद्धच क्रान्त्या केल्या गेल्या. या क्रान्त्या, राजसत्ता त्याच्या इतर गोष्टींसह कशी निकृष्टावस्थेला गेली, आणि ती राजसत्ता आपल्या स्वतांच्या शासकवर्गाची कामगिरी योग्यप्रकारें कशी बजावीत नव्हती हें निदर्शनास आणतात. रशियाच्या झारसारखे राजेही परिस्थितीच्या पेचामुळें अंध व प्रभावहीन ठरले. अशा प्रसंगीं सुद्धा लोकांची वर्णसंकराच्या विरुद्ध अशा स्वरूपाची क्रान्ती घडून आली. परंतु वर्णसंकर इतक्या नीच अवस्थेप्रत पोहोंचला होता कीं लोकांची सांस्कृतिक वर्गांतील परस्पर सेंद्रिय संबंधविषयक भावना लयाला गेली होती. क्रान्तिकारकांना वर्गसंबंध अन्याय्य स्वरूपाचें झालें आहेत हें समजलें व याला न्याय्य मार्गावर आणण्याचा त्यांच्या दृष्टीनें ठरलेला मार्ग ह्मणजे अस्तित्वांत असलेल्या पद्धतीचा समूळ विनाश. या हेतुनें त्यांनीं सर्व गोष्टींचा विध्वंस करण्याचें ठरविलें. यानंतरच्या राज्यसंस्थेचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होईल याबद्दल मात्र त्यांचा कांहींच विचार नसतो.

चालू युगांतील मोठ्या क्रान्तींचा प्रारंभ कांहीं ध्येयवादी पुढाऱ्याकडून झाला व पुढें त्याच पुढाऱ्यांना बंधमुक्त झालेल्या शक्ति-प्रवाहाना दाबात ठेवता आलें नाहीं. सामान्य जनता खवळल्या बरोबरच त्यांच्या प्रभुत्वाला उतरतीं कळा लागली. नीच मनोवृत्तीनें प्रेरित झालेल्या सामान्य जनतेनें सांस्कृतिक स्वरूपाच्या कृती व मानवी जीवित इत्यादि सर्वांचा विध्वंस आरंभिला. विषयसुख, अनिर्बंध स्वातंत्र्य व सत्तेची लालसा या भावनेशिवाय जनतेच्या मनांत भविष्यकालाबद्दल काहीं विचार असतो किंवा नाहीं हें सांगणें शक्य नाहीं. निदान अशा जनतेचें पुढारी ( जे खरें पुढारी नव्हत ) याना मात्र स्वताच्या स्वार्थाची व बढाईची पूर्ण जाणीव असतें.

इतिहासानें दर्शविलें आहे कीं, ज्या ज्या काळीं सामान्य जनतेनें अत्यंत क्रूर व रानटी प्रकारचे अत्याचार केले, त्या त्या कालाचा अंत एकाद्या सामर्थ्यसंपन्न सुलतानशहानें उपयोजिलेल्या पाशवी शक्तीच्य जोरावरच झालेला आहे. नैसर्गिक वर्गांच्या दृष्टीनें ही नवीन सेंद्रिय संबंधाच्या मार्गांतील पहिली पायरी होय.

नैसर्गिक शक्तींना जर योग्यवेळीं क्रान्तिरूपी उत्पातापासून समाज संरक्षण करण्यास्तव चालना दिली गेली नाहीं तर अनैसर्गिक सामाजिक वैषम्यावस्थेंतून साम्यावस्था प्रस्थापित करण्यासाठीं क्रान्ती हें एक प्रकारचें अपरिहार्य आंदोलन होय – ( "Revolution is the inevitable swinging back to equilibrium of an unnaturally disturbed social balance, if natural forces are not put into motion in time to save

the eruption. ) अठराव्या शतकातील फ्रान्समध्यें व एकोणिसाव्या शतकातील रशियामध्यें आचारभ्रष्ट व स्वार्थी सरदारवर्ग व स्वार्थलोलुप औद्योगिक भांडवलशाही हें वर्गच संस्कृतिच्या उच्च शिखरावरून अवनतिच्या खोल दरींत घसरू लागलें होतें. क्रान्तीचें बीज राष्ट्रातील जनतेच्या सामुदायिक अंतर्मनोभूमिकेंत (Collective unconscious) पेरलें जातें व योग्यवेळीं क्रान्तिकारक शक्तींना चालना देण्यात जे यशस्वी ठरतात असें काही कटवाले जनतेचें लक्ष वेधून घेतात. अर्थात् त्यांचा कार्याचा काल मात्र फारच अल्प असतो कारण त्यानीं बंधमुक्त केलेल्या शक्ती त्यांना दाबात ठेवता येत नाहींत. व्यवहारज्ञानापासून फारकत झालेला ध्येयवाद पूर्वी म्हटल्याप्रमाणें सामाजिक दृष्ट्या विघातकच ठरतो–( Idealism divorced from common sense is, as I have also mentioned elsewhere highly socially dangerous. )

स्वार्थापासून स्वार्थाची उत्पत्ति होते व सात्विक संतापही येतो. जर दोष कोणाला द्यावयाचा असेल तर तो समाजस्वास्थ्याचा विघात करणारा व समाजाच्या मनात क्रान्तिबीज पेरणारा असा आचारभ्रष्ट वर्ग यालाच द्यावयास पाहिजे. तो दोष रक्तपात व विनाश करणाऱ्या रानटी लोकाना मात्र देता कामा नये.

नैतिकदृष्टया क्रान्तीची अवहेलना करणें फार सोपें आहे. पण हें बरोबर नव्हे. क्रान्ती ही अनैसर्गिक क्रियेची नैसर्गिक प्रतिक्रिया होय–( It is easy to condemn a revolution morally. It is not correct - Revolution is a natural reaction to an unnatural strain.). आपण ज्वालामुखीच्या स्फोटाची

सुद्धां निंदा करूं शकतो. परतु समाजप्रिय प्राणी या दृष्टीनें सामुदायिक मनातील ज्या भावना क्रान्तिकारक वृत्तींना योग्यप्रकारें विरोध करूं शकतील अशाच भावनाना चालना देणें हें आपलें कर्तव्य होय. अशा शक्ती उत्क्रान्तिवादी असल्या ह्मणजे त्यायोगें नैसर्गिक वाढ किंवा योग्य जुळणी होण्यास मदत होणार आहे.

आपण कल्पना करू कीं, एका बॉयलरमध्यें वाफेचा दाब बऱ्याच प्रमाणात वाढला आहे व तो आता स्फोट होण्याच्या बेतात आहे. तर अशावेळीं तेथील कार्यकर्ता त्या यत्रातील संरक्षणद्वारें (Safetyvalves) उघडी करून तो दाब हळुहळू कमी करील, परतु जर त्यानें असें न करता तो दाब मुख्य द्वार उघडून एकदम कमी करण्याचा प्रयत्न केला तर त्यानें स्फोटच होईल. याचप्रमाणें नैसर्गिक वर्गांच्या वर्णसंकरानें विचलित झालेल्या समाजाचें स्वरूप असतें. समाजाच्या सामान्य जन-मनातील भावनाना हळुहळूंच योग्य वळण दिलें पाहिजे. असें कांहीं झालें नाहीं तर मग समाजात क्रान्तिचा उद्भव होणार हें ठरलेलेंच आहे.

येथपर्यंत क्रान्तीचें वास्तविक स्वरूपाचें अवलोकन केलें. दोन कारणास्तव क्रान्ती हें ध्येय ह्मणून स्वीकारता येत नाहीं. कारण हें कीं, ज्याप्रमाणें एकाद्याला त्याच्या गुन्ह्याबद्दल मृत्युची शिक्षा सांगणे तर्कशून्य, त्याचप्रमाणें क्रान्तीचें तत्त्वही तर्कहीन ठरतें. एकदां झालेली हानि पुन्हा हानि केल्यानें कशी भरून येणार ? क्रान्तीला तर्कहीन ह्मणावयाचें कारण असें कीं, त्यायोगें वर्तमानकालीन सत्याकडे दुर्लक्ष केलें जाऊन कधींही सत्यसृष्टींत अवतीर्ण न होणाऱ्या अशा कल्पनिक भविष्यकालाचा समाजाला ध्यास लागतो. वर्तमानकालाशींच आपण

सर्व तऱ्हेनें लढूं शकतो व तें आपल्या स्वाधीन असतें. वर्तमानकालांतच आपण कांहीं तरी करूं शकतो व त्याप्रमाणें वर्तमानकालच विधायक ठरूं शकतो. ' भविष्यकाल ह्मणजे एक स्वप्न आहे. तें कधीं ही खरें ठरणार नाहीं. क्रान्तिकारक हा स्वप्नसृष्टींत वावरणारा व मनोराज्य करणारा ठरतो कारण तो वर्तमानयुगांतून आपली मुक्तता करून घेण्यास व स्वप्नवत् भविष्यकालाच्या उदरातून एखादें नूतनयुगस्वरूप बालक अवतार धारण करील या दृढ आशेनें वर्तमानकालाचा विनाश करण्यास उद्युक्त होतो '—The future is a dream. It may never come. The revolutionist is an impractical dreamer, because he tries to escape from the now by destroying it in order that something-anything might come to be in a dream future. ) विनाशक शक्तींना आपलें कार्य करण्यास मोकळें सोडून आपण विधायक कार्यक्रमाला सहाय्यक होणें हें योग्य होय. जर या शक्तींना आपापल्या विवक्षित नैसर्गिक कक्षेंत कार्य करूं दिलें तर त्या शेवटीं उपयुक्त ठरतात व तें कार्य करण्यास त्या समर्थ असतात.

व्यवहारी माणसें चालू क्षणीं कोणतें कार्य करता येईल याचा विचार करतात. व खरें पाहिलें तर यानाच दूरदृष्टी आहे असें ह्मणतां येईल. आपल्या ध्येयाची पूर्तता, उत्कृष्ट राष्ट्राची त्याची जागृत स्वप्नें ते येथेंच वर्तमानकालींच पूर्ण झालेली पाहण्यास उत्सुक असतात. या प्रकारचें कार्य उपयुक्त ठरलें याची साक्ष आपणास इतिहास देतो. परंतु हेंही पाहणें उद्बोधक ठरेल कीं जर कॅमिली डेस्मोलिनस् ( Camille

Desmoulins ) व केरेन्स्की ( Kerenski ) यांना भविष्यकालीं झालेल्या सांस्कृतिक विनाशाची कल्पना प्रथम आली असती तर त्यांनीं क्रान्तिकारक शक्तींना नंगा नाच करण्यास सहाय्य केलें असतें काय ?

व्यवहारकौशल्ययुक्त जर सात्विकसंताप असेल तर तो समाजाला उपयुक्त ठरतो नाहींतर तो अपायकारकच होतो–( Righteous indignation is a valuable social power, provided, it goes hand in hand with common sense. Otherwise it will be useless or even dangerous. )

विनाशक ध्येयाच्या बुडाशीं सूडबुद्धीच असतें; स्वार्थसाधनाची इच्छा व इतर शुद्धभावना क्वचित्‌च दिसून येतें. क्रान्ती ही सर्वसाधारणतः प्रथमावस्थेंतील सूडबुद्धी, मारामारी व लुटालूट इत्यादि भावनांना बंधमुक्त करण्याचें एक मुक्तद्वारच बनतें.

राजकीय किंवा क्रान्तिकारक खून करणें हें सामान्य जनतेला नाहीसें करण्याचें फार सुलभ साधन आहे. आपल्या तत्वाना विरोधक व ठगविक राहाणीप्रमाणें राहण्यास जे समर्थ नाहींत अशा लोकांना मृत्युमुखीं देऊन 'सुवर्णयुग' निर्माण करता येईल. परतु असें झाल्यानंतर तरी बाकी राहिलेलें लोक आपापसांतच कलह करणार नाहींत कशावरून असा संशय येतोच.

रशिया हें याचें अल्पशा प्रमाणावरील एक उदाहरण आहे. जुन्या राज्यकारभारातील बरेंच लोक क्रान्तिच्या दिवसांत मारलें गेलें, परंतु सद्यःस्थितींत मात्र सोव्हियट रशियातील कम्युनिस्ट पक्षाला आपल्याच पक्षात उत्पन्न झालेली विरोधी वृत्ती जाचक होत आहे. याची

माक्ष पर्यां यापैकीं पुष्कळ लोक व लेनिनचें इमानदार सहाय्यक इत्यादिकाना गेल्या थोड्या वर्षांतच फासावर चढविण्यांत आलें यात सांपडतें. अतिरेकी क्रान्तिकारकांना क्रान्तिविरोधी ह्मणून संबोधण्यात आलें. अर्थात् याचा दोष पक्षातील सभासदांकडे येतो का पक्षातील प्रमुख सत्ताधीशाकडे येतो याचें विवेचन करण्याचें हें स्थल नव्हे. एवढें मात्र खरें कीं बहुताशीं याचा दोष त्यांच्या पक्षातील क्रान्तिकारक भावनेंतच आहे.

फ्रेंच राज्यक्रान्तींत मोठमोठ्या क्रान्तिकारकांनीं एकमेकाना राष्ट्र-विरोधी ठरवून एकमेकाचें जीव घेण्यास कमी केलें नाहीं. परंतु रशियांत तर हेंच कृत्य क्रान्ति यशस्वी झाल्यावरही बऱ्याच कालपर्यंत चालू होतें. अर्थात् रशियात घडून आलेलें औद्योगिक व सामाजिक प्रयोग व साध्य झालेल्या कांहीं गोष्टी ज्याप्रमाणें प्रशंसनीय ठरतात, त्याचप्रमाणें त्या क्रान्तीची आंतील दूषित बाजू, आणि ज्या पुरातन संस्कृतिच्या भरून न येणाऱ्या विनाशावर नव्या रशियाची स्थापना कशी झाली आहे याकडेहि पाहणें आवश्यक आहे.

भाविकालांत ज्यावेळीं क्रान्तीचा इतिहास लिहिला जाईल तेव्हां तिचे फायदेही त्यावेळीं वर्णिले जातील. परंतु सध्यां मात्र क्रान्तीच्या उपयुक्ततेविषयी अनुमानें काढणें योग्य ठरत नाहीं. लाभाबरोबरच मानवी जीविताच्या नाशानें झालेली आर्थिक हानि व सांस्कृतिक विनाश या नुकसानीचाही विचार करणें आवश्यक आहे. मानवी जीविताच्या हानिखेरीज सांस्कृतिक परंपरा व लोकांची मालमत्ता इत्यादिकांची कधीं ही भरून न येणारी हानि मात्र फार होतें.

पूर्वी ह्मटलेंच आहे कीं ज्यावेळीं एकाद्या राष्ट्रात क्रान्ती होतें त्यावेळीं त्या राष्ट्राला क्रान्ती योग्य असतें. एक सुप्रसिद्ध वचन आहे कीं, प्रत्येक राष्ट्राचें आपल्याला योग्य असें राजकारण असतें कारण तें राजकारण त्या राष्ट्रानेंच बनविलेंलें असतें—( Every nation has the politics, which it deserves, because they are of its own making. )

राष्ट्रीय परंपरा, स्वभाववैशिष्ट्य, व इतर गरजा इत्यादि गोष्टींनीं युक्त असें राजकारण सोडून दिलें तरी एका राष्ट्रावर दुसऱ्या राष्ट्राच्या राजकीय तत्वाचा परिणाम होतोच. उदारमतवादी, समाजवादी ( Socialistic ), समाजसत्तावादी ( Communistic ), फॅसिस्ट किंवा राष्ट्रीयसमाजसत्तावादी ( national-socialist ) इत्यादि विचार व ध्येयें ही साथीच्या रोगाप्रमाणेंच परिणामीं दोषी ठरतात. अशा दूषित साथीच्या योगानें फारच घोटाळे माजून त्रास व कालाचा अपव्यय मात्र होतो.

तात्पर्य हें कीं, सार्वत्रिक समाधानाची आवश्यकता असल्यास त्या त्या राष्ट्रानें आपलें राजकारण राष्ट्रीय परंपरा, राष्ट्रीय मनोधर्मात्मक वैशिष्ट्य आणि राष्ट्रीय गरजा इत्यादि गोष्टींचा विचार करूनच ठरवावें. परकीय विचाराची आयात, आयात करणाऱ्या राष्ट्राच्या भाषेंत व त्या राष्ट्रांच्या गरजा भागविण्यास उपयुक्त ठरेल अशाच स्वरूपात झाली पाहिजे—( Hence politics in a given country have to be coined consciously on a basis of national traditions, national psychological characteristics and national needs, if they are wanted to be satis-

factory. They must not be imported from abroad untranslated into the ways of expression and needs of the importing country.)

निरनिराळ्या व्यक्ति ज्याप्रमाणें निरनिराळ्या रोगानें पीडित झालेल्या असतात, त्याचप्रमाणें निरनिराळीं राष्ट्रें निरनिराळ्या रोगांनीं जर्जर झालेली असतात. एका राष्ट्राला उपयुक्त ठरलेली उपाययोजना दुसऱ्या राष्ट्राला अधिक नुकसानकारक ठरेल. रोग जरी एकच असला तरी त्याच्या अवस्थामध्यें फरक असतो व चुकीचें औषध अयोग्यवेळीं दिलें गेलें तर रोगातील दोषाची वाढ होऊन रोग वाढीस लागतो — ( Different countries, like individual people, suffer from different diseases. The medicine for one country may make the disease of another worse. It may happen to be the same disease, but the stages may vary, and the wrong medicine applied at the wrong time may aggravate the trouble. ).

एकदा मुसोलिनीनें एक उत्कृष्ट तत्त्व सांगितलें. तो ह्मणाला कीं, " फॅसिझम् ही काहीं निर्यात करण्याची वस्तु नव्हे" ( Fascism is not an export article ). ह्मणजे त्याला हें मान्य होतें कीं त्यावेळीं इटलीला जरी ती गोष्ट अत्यंत योग्य व उपयुक्त ठरली तशी ती इतर राष्ट्रांना उपयुक्त ठरेल असें मात्र नाहीं. फॅसिझम् मध्यें राष्ट्रीय मनोवृत्तीचा सूक्ष्म अभ्यास केला गेला. उलटपक्षीं दुसऱ्या देशांत लोकांना आपल्या पंथाचें अनुयायी करण्यात गुंतलेल्या राष्ट्रीय-समाजसत्तावादात याच सूक्ष्म अभ्यासाचा अत्यंत अभाव होता. कम्यु-

निझमची प्रचाराच्या बाबतींत हीच स्थिती होती. कम्युनिझम हें मूळस्वरूपात—इतर ठिकाणीं प्रसार पावलेल्या स्वरूपात नव्हे-राजकीय तत्व नसून एक जीवनपद्धतिच होय, आणि म्हणून त्याला अंतरराष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें, तर दुसऱ्यापक्षीं राष्ट्रीय समाजसत्तावाद हा मूलतः राजकीय स्वरूपाचाच होता व तो त्या एका राष्ट्रापुरताच राहिला.

वायव्य दिशेकडील युरोपातील काहीं राष्ट्रांत राष्ट्रीय समाज-सत्तावाद किंवा फॅसिझम् हा आपलें स्थान थोड्या कालापूर्वी लोकांच्या मनांत कायम करूं लागला होता, परंतु तात्कालच असें दृष्टोत्पत्तीस आलें कीं, परकीय नवें तत्वज्ञान या राष्ट्रांतील जनतेच्या परंपरेला व राष्ट्रीय स्वभावाला पोषक असें नाहीं. राष्ट्रीय समाजसत्तावादाला जर्म-नींतच बरेंच कार्य करावयाचें होतें. ब्रिटिश, बेल्जियन, डच व स्कॅन्डी-नेव्हियन इत्यादि जनतेच्या परंपरा व राजकीय गरजा जर्मनीहून इतक्या भिन्न होत्या कीं जर्मनीच्या नाझी तत्वज्ञानाचें अंधानुकरणानें लोकांना चालना मिळणें मुळींच शक्य नव्हतें. याचें प्रत्यंतर हॉलंडमध्ये पहा-वयास मिळतें. १९३५ मध्यें निवडणुकीच्या वेळीं राष्ट्रीय समाज-सत्तावादी पक्षाचें मात प्रतिनिधी वरिष्ट विधिमंडळांत होते. १९३७ च्या जूनमध्यें त्याची बरीच निराशा झाली व त्यावेळीं त्याचें अर्धेअधिक मतदार कमी झालें व त्याचें चारच प्रतिनिधी कायम राहिलें.

परकीय राजकीय तत्वाची अयात करण्याचा विचार करतांना हिंदुस्थानाला एक धोक्याची सूचना देणें या स्थळीं अनुचित ठरणार नाहीं. मला याचें वारंवार आश्चर्य वाटतें कीं, पाश्चात्याच्या गोष्टींचा

धिक्कार व तिरस्कार करण्यात जो राष्ट्रीय हिंदुस्थान कडक असतो तोच हिंदुस्थान सोशॅलिझम् व कम्युनिझम इत्यादि नमुनेदार तत्वाना उराशीं बाळगण्यात तत्पर होत आहे व त्याचे ग्रहण करीत आहे. विशिष्ट कालखंडात युरोपमध्ये समाजसत्तावादानें सामाजिक व आर्थिक सुधारणा साध्य करून घेतल्या आणि सोव्हियटीझमनें रशियात औद्योगिक प्रयोग यशस्वी करून दाखविले तरी पण हें लक्षात बाळगणें अत्यंत आवश्यक आहे कीं समाजसत्तावाद हा युरोपच्या राजकीय प्रगतिच्या मार्गांत विशिष्ट अवस्थेपुरताच उपयुक्त होता व सोव्हियटीझम्चा जन्म व वाढ रशियन भूमीवर झालेली आहे. हिंदुस्थानातील तर सामाजिक परिस्थिती व गरजा फारच भिन्न असून राजकीय दृष्ट्या देश अद्याप प्रथमावस्थेतच आहे. प्राचीन परंपरेच्या पुनरुज्जीवनानेंच खऱ्या राष्ट्रीयतेला स्फूर्ति मिळून तें एक उत्कृष्ट कार्य होणार आहे. हिंदुस्थानातील राजकीय व सामाजिक संबंधविषयक प्रश्न सोडविण्याची गुरुकिल्ली चातुर्वर्ण्याच्या तत्वात व भारतीय इतिहासांतच सापडेल. याचा विचार पुढील प्रकरणी होईल. औद्योगिक प्रश्न सोडविण्याच्या काही महत्वाच्या युक्त्या मात्र हिंदुस्थानला पाश्चात्याकडून अनुकरणीय आहेत, तरी पण त्यांनी हें मात्र लक्षात ठेवावें कीं अद्याप पाश्चात्य देशांत पुष्कळ औद्योगिक प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडविले गेलें नाहींत.

जाता जाता एवढें सांगावेसें वाटतें कीं सोव्हियटीझम् ( किंवा जो कम्युनिझम् या नावाने बराच ओळखला जातो ) व त्याचे तत्त्व हिंदुत्वाच्या व इस्लामी तत्त्वाना विरोधी असें आहे. लेनिननें ह्मटलें

आहे कीं, " आधिभौतिक जडवाद हें सोव्हियट रशियाचें तत्त्वज्ञान आहे " ( ' Materialism is the official philosophy of Soviet Russia ' ) यावरूनच हें स्पष्ट होतें कीं तेंच तत्त्व हिंदुच्या किती तरी पथाच्या तत्त्वज्ञानाला अत्यंत विरोधी ठरत आहे. धार्मिक छळ हा तर हिंदुस्थानांतील सहिष्णुता व धार्मिक स्वातंत्र्य या तत्त्वांना अत्यंत विरोधक आहे. तसेंच वर्गकलहाचें तत्त्वही मंदिर स्वरूपाच्या सांस्कृतिक वर्गव्यवस्थेला विरोधीच आहे. त्याचप्रमाणें कम्युनिझमचें तत्त्व इस्लामी धर्माचें ईश्वरेच्छेच्या स्वीकाराचें तत्त्वाला विरोधी आहे. आसद बे ह्मणतो, " लेनिनचें तत्त्वज्ञान इस्लामी तत्त्वज्ञानाला अत्यंत विरोधी आहे. वर्गकलहाचें तत्त्वही श्रीमंती व गरीबी ही इतर कांहीं नसून दैवाचा खेळ आहे व या बाबतींत जीवाच्या दृष्टीलाच महत्त्व जास्त अशा प्रकारच्या तत्त्वाला विरुद्ध आहे. श्रीमंताची उदारबुद्धी, गरीबांची समाधानवृत्ती व त्या दोन्ही वर्गांचा विनम्रपणा, ईश्वर सर्वांचा पिता व आपण सर्व बंधु या विचारात व आचारात दिसून येतात. इस्लामी संस्कृति श्रीमंतांना व गरीबांना अभिमानास्पद वाटते. मॉस्कोचें तत्त्वज्ञान या संस्कृतीचा स्वीकार करूं शकत नाहीं—(" Assad Bey, a German traveller, who is a Muslim, remarked : " The spirit of Lenin is in complete opposition to the spirit of Islam. The doctrine of class struggle is straight against the Islamic principle that riches and poverty are nothing essential but only chance and fate, that only the soul's attitude is of importance : the liberality of the well-to-do, the devout

contentment of the poor, and the humility of both which consider themselves as brothers before God and act as such. The Islamic culture is the pride of the rich as well as of the poor. The spirit of Moscow connot bear this culture." )

आता पहिल्या विषयाकडे वळूं. क्रान्तीचें प्रतिपादक असें तर्कट चालवतील कीं, काहीं नवें बांधकाम करावयाचें असल्यास थोडा फार नाश हा व्हावाच लागतो. उदाहरणार्थ घराचें बांधकाम. आणि असें पाहिलें असता शेवटीं शंकराचें संहारकार्य करावेंच लागतें व होतच असतें. परंतु हा जो संहार होतो तो जीवन स्वातंत्र्यमय होण्याकरता व आत्मप्रकाशाची ज्योत तेजस्वी होण्याकरता होत असतो. कल्पनासाम्राज्याचा तेथें काहीं संबंध नसतो.

एखादें घर पाडतांना शेजारचें घर पाडलें जाणार नाहीं याची काळजी घेतली जातें, तसेंच त्याचस्थळीं नवीन भावी घराचें नकाशें, बांधणीस लागणारें सामान सर्व तयार असतें, व कॉन्ट्रॅक्टरही आपलें काम सुरू करण्यास तत्पर असतो.

ज्यावेळीं क्रान्तीचें शक्तिप्रवाह मोकाट सुटतात त्यावेळीं भावीकाल कसा येणार याबद्दलची थोडया लोकानाच अंधुक कल्पना असतें; परंतु सामान्य जनता मात्र संसर्गानें बेफाम होतें व आपल्या रानटी वृत्तींना मोकळें सोडतें. ज्या घटना घडत असतात त्याच्यावरील ताबा ढिला पडतो, बुद्धी विरोधी भावनानीं हतप्रभ होतें व सामुदायिक मनांतील भूतसचार चालूच राहतो.

रक्तपातहीन व योग्य मार्गदर्शकत्वाखालीं घडून आलेली क्रान्तीची काहीं उदाहरणे सापडतात. इटलीमधील फॅसिस्ट क्रान्ती व जर्मनीमधील राष्ट्रीय समाजसत्तावादी क्रान्ती ही अशा प्रकारच्या क्रान्तीची अर्धवट उदाहरणें होत. अशा क्रान्त्या राष्ट्राच्या योग्यतेंतील प्रगतिचा नैसर्गिक परिणाम ह्मणूनच विवक्षित प्रसंगी घडून येतात. लोकमतावर छाप पाडण्याचें व समाजाच्या अंतर्मनाची योग्य तयारी करण्याचें दीर्घकालपर्यंत केलेलें प्रयत्न शेवटीं योग्यप्रकारेंच फलदायी ठरतात. हें कार्य जननक्रियेप्रमाणेंच उत्क्रान्तस्वरूपाचें आहे. पुढारी लोकांनीं मात्र मोठया प्रश्नाची योग्य जाणीव ठेवावी.

याच्या उलट स्वरूपाच्या क्रान्तीची तुलना जबरदस्तीच्या गर्भ-पाताशीं करावी लागेल. अशा योगानें माता ( जुनी राज्यपद्धती ) अपकालीं झालेल्या पुत्रजन्मानें मृत पावेल किंवा गंभीर स्वरूपाचा तिला अपाय तरी होईल आणि दुसऱ्या पक्षीं तें जन्मलेलें मूल ( नवी राज्यपद्धति ) जिवंतही राहणार नाहीं किंवा यदाकदाचित् जिवंत राहिलेंच तर जन्मभर अर्धवट स्वरूपाचें ( a cripple for life ) राहील. परिणत स्वरूपाच्या क्रान्तीमध्यें मातेकडूनच जन्मलेल्या मूलाचें संगोपन, पोषण व शिक्षण होत असतें.

अशा प्रकारची पूर्वतयारी करण्याकरताच राष्ट्राराष्ट्रांतील बंधुत्वाचें तत्त्व पुढें येत आहे व याच योगानें पुढें केव्हां तरी याच मार्गाचा अवलंब केल्यास जगद्राष्ट्राचा उदय होईल.

आपण वर ज्या दोन प्रकारच्या क्रान्तीचें विवेचन केलें आहे तें ह्मणजे अर्धवट माणसांनी केलेलीं क्रान्ती हें एक टोक तर सावध-

गिरीनें सामाजिक कार्यकर्त्यांनीं सूक्ष्मप्रकारें घडवून आणलेली क्रान्ती हें दुसरें टोक होय. ऐतिहासिक क्रान्त्या मात्र सर्व या दोन्ही टोकांच्या आधल्या मधल्याच होत्या—कांहींमध्यें पहिलें तत्त्व प्रभावी होतें तर कांहींमध्यें दुसरें तत्त्व प्रभावी होतें.

क्रान्तिकारक ध्येयाचा विचार प्रत्येक मनुष्यानें फार काळजी-पूर्वक केला पाहिजे. रक्तपात, भावनाशीलता, व विनाश यामध्यें उदात्त स्वरूपाचें व प्रतिष्ठेचें असें कांहीच नाहीं. उलटपक्षीं, निरूपद्रवता, सहनशीलता व सहकारितेच्या ध्येयांतर त्यागवृत्ती आणि वैयक्तिक आचारसंपन्नतेचा जागृत ध्येयवाद इत्यादि गुणसमुच्चयच अधिक उदात्त व अधिक प्रतिष्ठायुक्त ठरतो. अर्थात एवढें मात्र खरें कीं हें कार्य अत्यंत दुर्घट आहे कारण याकरतां धैर्य, मर्दुमकी याची अत्यंत आवश्यकता आहे व याप्रकारें घडल्यास तें कार्य अधिक समाधान-कारक ठरतें.

शेवटीं कम्युनिझमच्या विविध तत्त्वाचा थोडासा विचार करूं. आतां सोशियलिझम् व कम्युनिझम् एकच झालें आहेत. परंतु कम्यु-निझमच्या तत्त्वाच्या बुडाशीं मानवी व्यवहाराची अशी एक काल्पनिक घटना आहे कीं ज्यामध्यें मानव मानवतेशीं व विशेषतः समाजाशीं समरस होऊन समाजप्रिय प्राणी म्हणून वावरूं लागेल; आणि हा मानव याच बंधुवर्गाच्या ऐक्याच्या भावनेनें व याच हेतुनें आपलें कार्य करूं लागेल व यातच समाधान मानूं लागेल. माझ्या लवकरच प्रसिद्ध होणाऱ्या पुढील पुस्तकात या मानवी व्यवहाराचें विवरण मी सांगोपांग रीतीनें करणार आहे व या स्वरूपाचें दृश्य आपणाला मानवी इतिहासा-

ध्येय उषःकालीं अज्ञात स्वरूपात अस्तित्वांत असल्याचें आढळतें या दृष्टीनें व हें दृश्य ह्मणजे मानवी जीविताचें भविष्यकालीं ज्ञातस्वरूपांत सिद्ध होणारे अंतिम ध्येय आहे या दृष्टीनेंही या विषयाचा विचार होणार आहे. मुंग्या, माशा, हरिण, हत्ती इत्यादि कळप करून राह-णाऱ्या प्राण्याप्रमाणेंच ज्या युगात प्रथमावस्थेंतील मानव आपल्या इतर बांधवाशीं सहकार्यानें राहत होता त्या युगातील पांचही खंडाच्या लोकातील ‘ सुवर्णयुग ’ रंगविणाऱ्या कल्पककथा, लोककथा व दंत कथा या तत्कालीन आठवणींचे अगरच होय. या गुणाखेरीज मानवाला भावना व अध्यात्मिकप्रेरणा या पशुकोटींत नसलेल्या शक्तींची ही देणगी दिली आहे.

मानवी वंशाच्या संपूर्ण इतिहासातून असें आढळतें कीं, सुसंगत मानवीसंबंधयुक्त, विश्वात्मक व सामाजिक ऐक्ययुक्त अशा स्थितीची ( State of cosmic and social-mystic unity implying perfectly harmonious human relations ) पुन्हा स्थापना करावी या कल्पनेची सुखस्वप्नें मानवजात पहात आली आहे. ख्रिस्ताची पृथ्वीवरील स्वर्गराज्याची कल्पना, हिंदुंची ‘ रामराज्याची ’ कल्पना, प्राचीन व अर्वाचीन कल्पनासृष्टींतील मूलभूत असलेल्या स्फूर्तिदायक कल्पना, तसेंच कम्युनिझम् व समाजवाद यातील कल्पना या सर्व त्या सुवर्णयुगातील कल्पना आहेत. कांहीं परिपूर्ण व कांहीं अपूर्ण अशा स्वरूपाच्या आहेत. लेओझेनें ‘ अदृश्य राज्यकर्त्यांची ’ वर्णन केलेली अवस्था याला बरोबर लागूं पडतें.

ही साधी व्यवहाराची गोष्ट आहे कीं, कोणत्याही अवस्थेमध्यें सुवर्णयुगांतील ती परिस्थिती आता कायद्यानें व गैरकायद्यानें किंवा जबरदस्तीनें निर्माण करणें शक्य कोटींतील नाहीं. सद्यःकालीन मानव या अवस्थेकरतां नुसता उत्सुकच आहे असें नाहीं तर त्या प्रकारच्या कल्पना त्याच्या हृदयांतरीं वसत आहेत, आणि त्या कल्पनाचा आविष्कार करण्याची संधि मानवतेच्या पुढारीवर्गांनीं आणून दिल्यास भविष्यकालीन युगात त्या कल्पनाचें परिणत स्वरुप सत्यसृष्टींत दृग्गोचर होईल व त्यावेळीं आताच्या सुधारलेल्या मानवापेक्षा अत्यंत भिन्न स्वरुपाचा मानव दिसूं लागेल. कारण हीं स्थिती पूर्वींच्या रानटी मानवापेक्षा बऱ्याच भिन्न स्वरुपाची असणार.



## प्रकरण ९ वें

# जागतिक राजकारणाचें भवितव्य

या प्रकरणाच्या वर्ण्य विषयाकडे वळण्यापूर्वीं या प्रकरणाच्या शीर्षकातील जी एक प्रकारची भविष्यकथनाची झाक भासतें, त्याचें स्पष्टीकरण केलें पाहिजे. राजकारणी मुत्सद्याच्या भाषणात भावीकालाबद्दल काहीं अनुमानें सयुक्तिक ठरलीं तरी तीं समाजशास्त्रज्ञाच्या विवेचनात अनुचित ठरतात.

सामाजिक व राजकीय विचारप्रवाहाचा व त्याच्या विकासाचा अभ्यास करणें आणि याच विचारप्रवाहाचें ऐतिहासिक तुलनात्मक पद्धतीनें भविष्यकालीन स्वरूप तर्कशुद्ध पद्धतीनें ठरविणें ही अत्यंत उपयुक्त गोष्ट आहे. काहीं आधुनिक मोठ्या समाजशास्त्रज्ञानीं महत्वाच्या व बहुमोलाच्या धोक्याच्या सूचना आपल्या ग्रंथातून नमूद केल्या आहेत. भावीकाल पाहण्याची ज्याची शक्ति आहे त्याना वर्तमानकालातच भविष्यकाल दिसतो.

राजकारणी पुरुष एखाद्या राजकीय तत्वाचा स्वीकार करून तें तत्त्व आचरणात आणण्याचा प्रयत्न करतो. परंतु एखाद्या राजकीय पक्षाच्या बहुसंख्याक सभासदाना आपल्या पक्षाचा कार्यक्रम आणि आपल्या पक्षाच्या राजकीय ध्येयाचें मूलभूत राजकीय तत्वज्ञान याची विशेष किंवा मुळींच काहीं माहिती नसतें. ते सर्व नावाच्या भपक्यानें

आकर्षिले जातात- (They follow the glamour of name) समाजसत्तावादी, उदारमतवादी, पुराणमतवादी, साम्राज्यवादी, कम्युनिस्ट इत्यादि निरनिराळे पक्ष अस्तित्वात आहेत, कारण त्या त्या पक्षाचें एखाद्या जनतेच्या संघाशीं काही गुप्त करार असतो किंवा दुसऱ्या एखाद्या संघाशीं विरोध असतो ह्मणूनच हे पक्ष उद्भवतात. विशेषतः अलिकडे विरोधामुळेंच पक्षनिर्मिती होते. तेव्हां एखाद्या पक्षामध्यें पुष्कळ सभासद असतात, परंतु ते या पक्षामध्यें त्या पक्षाच्या राजकीय श्रीदाचें (creed) पालन करतात ह्मणून किंवा त्याबद्दल विचार केला आहे अशा दृष्टीनें भाग घेतलेले नसतात, तर एका विशिष्ट सबकलनेनें ते त्यात शिरतात. जर त्याना त्याच्या पक्षाच्या राजकीय श्रीदाचें किंवा ध्येयाचें विवरण करा ह्मणून सांगितलें तर ते घोटाळ्यात पडतात व प्रत्येकजण आपापल्यापरी त्याचें स्पष्टीकरण करतो. आणि त्यातील थोडेंच असें धैर्यशील असतात कीं जे आपल्याला तें श्रीद वगैरे काही माहित नाहीं, परंतु आह्माला एकादा पुढारी आवडतो म्हणून आह्मीं त्या पक्षात भाग घेतला आहे असें सांगण्यास धजतात.

जर राजकारण हें मानवी हितसंबंधाचे व अतिमस्वरूपात मनोविकाराचें रणक्षेत्र ठरलें तर समाजशास्त्र हें शांततापूर्ण असे अभ्यासगृह आहे असें ठरेल—If politics is a battlefield of human interests and consequently of passions, sociology on the other hand is a peaceful house of study.)

समाजशास्त्रज्ञ जो असतो तो आपलें कार्य राजकीय भावना विरहित दृष्टीनें करीत असतो, व तो विषयाविषयी विचारदृष्टीनें प्रत्येक

प्रश्नाचा विचार करतो ह्मणजे आपले विचार शास्त्रीय दृष्टीनें मांडीत असतो. सर्व राजकीय ध्येयाची तो चाचणी करतो व त्याला त्यांत असें प्रत्ययास येतें कीं त्यातील काहीं उत्तम आहेत तर काहीं कनिष्ट प्रतीची आहेत. तो आपल्या कार्यांत सत्यनिष्ट असला तर त्याच्या मनांत कोणत्याही विशिष्ट समाजसंस्थाविषयी द्वेषभावना असूं नये व त्यानें आपल्या न्यायबुद्धीच्या मार्गांत स्वताच्या वैयक्तिक आवडीनिवडींना लुडबुड करूं न देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. राजकीय चळवळींत स्वतां भाग घेणें त्याला शक्य असलें तरी तें त्रासदायकच आहे, कारण तो मुख्यतः द्रष्टा म्हणून असतो. तो राजकीय लक्ष्याचें स्वरूप दुरूनच विकाररहित दृष्टीनें अवलोकन करतो आणि त्याची सहानुभूति सर्वपक्षाच्या व सर्व जातींच्या सभासदांकडे सारखीच असते. जर त्याला गंभीरतेनें विचारणा केली तर तो त्याचें स्पष्टीकरण टीकेनें करील परंतु ती टीका मात्र विधायक स्वरूपाची असेल आणि तो सर्वांनाच अभिन्नभावानें कांहीं विधायक सूचनाही करील. व या दृष्टीनें तो क्वचित् प्रसंगीं पुढाऱ्या पुढाऱ्यामध्यें मध्यस्थीचें कार्य करतो परंतु तें राजकीय भूमिकेवरून केलेलें नसतें.

सद्यःकालीन राजकीय परिस्थितीचें ज्ञान होण्याकरतां आपणाला मागील तीन हजार वर्षांच्या राजकीय इतिहासाचें विहंगमावलोकन करणें आवश्यक आहे. तीन हजार वर्षांपूर्वीं एक दोन रिपब्लिकस् (लोकराज्यें) अस्तित्वात होतीं परंतु सर्वसाधारणतः (aristocracy) अल्पसंख्याक सरदारशाहीच प्रचलित होती. आधुनिक लोकराज्यापेक्षां पूर्वींची लोक-राज्यें भिन्न स्वरूपाची असली तरी ती अल्पसंख्याकसत्तात्मकच होती.

त्यावेळीं सुद्धा राज्यें व साम्राज्यें अस्तित्वांत होतीं ( ह्मणजे साम्राज्यवाद हा कांहीं नवा नव्हे तर ). राजाच्या हातीं सर्व सत्ता असे. त्याच्या सत्तेची मदार सर्व अल्पसंख्याक सरदारवर्गावरच असे. अधिक सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास ती सत्ता उपाध्यायवर्गावरही (priest hood ) अधिष्टित होती. क्वचित् स्थळीं उदाहरणार्थ इजिप्तमध्यें राजा व धर्माधिकारी ( High Priest ) हीं एकच व्यक्ति असे. तथापि तिला उपाध्यायवर्गाच्या हितसंबंधाविरूद्ध अशा प्रकारची कोणतीही सुधारणा करणें शक्य नव्हतें. कारण उपाध्यायवर्ग हा संस्कृति व शास्त्र याचा प्रतिनिधिस्वरुप समजला जात असे. हा वर्ग प्राचीनकालीन प्रत्येक दरबारला मार्गदर्शक व उपदेशक या नात्यानें उपस्थित रहात असे. हिंदुस्थानातही हिंदु, बुद्ध किंवा यावनी या सर्व सम्राटाच्या दरबारातही अशा प्रकारचें सूज्ञ व विद्वान उपाध्यायवर्ग उपस्थित रहात असे.

तत्कालीन सरदारशाहीचें स्वरुप शौर्य, वैयक्तिक स्वार्थत्याग व सुबुद्ध राज्यकारभार इत्यादि गुणानीं युक्त होतें. योजना कौशल्य ( tact ) या गुणाची अत्यंत आवश्यकता असे. हिंदु धर्मग्रंथात क्षत्रियांना ( दुसरावर्ण—सरदार वे क्षत्रिय ) मानवाचें संरक्षक (protector) ह्मणून ह्मटलें आहे ते कांहीं उगीच नव्हे. तो वर्ग आपल्या सामर्थ्यानें सर्व जातींचें संरक्षण करी व आपल्या प्राणाची आहुती देण्यास सदैव तत्पर असे. ह्मणूनच त्याची फार थोरवी गायिली गेली आहे.

वर्णसंकराच्या आधुनिक कालात अंतरराष्ट्रीय दृष्टया पाहिलें तरी क्षत्रियवर्ग हा संरक्षक वर्ग या नावास अपात्रच ठरला आहे. हा वर्ग फारच आक्रमणशील बनला आहे किंवा जे आक्रमणशील आहेत

अशाच्या हातातील बाहुलें बनला असून तो आपल्या शक्तींचा दुरुपयोग करीत आहे. विषारी वायु व बाँबगोळे निरुपद्रवी भोळ्या जनतेचा नायनाट करतात. अर्थात् हें वर्णन कदाचित् अतिशयोक्तिपूर्ण असेल तरीपण आधुनिक युद्धात सुरक्षिततेचें स्थान ह्मणजे खंदक असें जे ह्मटले आहे ते महत्वाचें आहे—( In the modern war the safest places will be in the trenches. )

प्राचीन कालीं सरदारी अत्यंत कष्टानें प्राप्त होत असे. जणूं काहीं त्याच्याकरतां परीक्षाच उत्तीर्ण व्हाव्या लागत. लढाऊ वीरांना आपल्या सामर्थ्याची साक्ष पटवून द्यावी लागत असे व अशानेंच यश प्राप्त होत असे. तरीपण हें कार्य काहीं नुसत्या पाशवी शक्तीचें नसे. मध्ययुगीन सरदारांना आपली सरदारी शौर्याच्या व पराक्रमाच्या कृत्यांनींच प्राप्त करून घ्यावी लागत असे. एकाचा बाप सरदार होता ह्मणून त्याचा मुलगा आपोआपच सरदार झाला अशी स्थिती त्यावेळीं नव्हती. आपल्या शौर्याचें, पराक्रमाचें व मेवाकौशल्याचें त्याला प्रदर्शन करावें लागे व नंतरच त्याला पुढारीपद व अधिकाराची वस्त्रें दिली जात. हीच पद्धत सर्वत्र प्रचलित होती. कचित् ठिकाणीं अतिकडक परीक्षा घेतल्या जात. उदाहरणार्थ पेरूच्या ( Peru ) गादीचा भावी वारस निवडण्याकरतां जे शुद्धरक्ताचे उमेदवार असतील त्या सर्वांना शारीरिक व नैतिक असे कडक निर्बंध घातलें जात. यापैकीं जो या तीव्रस्वरूपाच्या परीक्षेंत शीलसंपन्न व शारीरिक दृष्ट्या सामर्थ्यसंपन्न ह्मणून उत्तीर्ण होई त्यालाच ती राजवस्त्रें अर्पण केली जात.

यानंतरच्या कालांत अनुवंशिक सरदारशाही द्रव्यसंपादन व अधिकारस्वीकार करण्याच्या मागें लागली व यामुळें हळुहळूं संरक्षणाच्या प्रत्यक्ष कार्यापासून परावृत्त होऊन आळस व आनंद यात मग्न झाली. या सरदारशाहीच्या प्रथमावस्थेंत जरी कला व शास्त्र याची प्रगति झाली असली तरी पुढें मात्र संस्कृतिला ती जाचक अशीच ठरली. पूर्वीच्या सरदारांना आपण ईश्वराच्या नेतृत्वाखालीं, क्रॉसकरता ह्मणा, चंद्रकोर असलेल्या निशाणाकरता ह्मणा, किंवा हिंदुधर्माकरता ह्मणा लढत आहोत याची पूर्ण जाणीव होती, परंतु पुढील कालात त्याचा धर्माशीं संबंधच तुटला गेला. सार्वत्रिक सुखाकरतां जीवन कंठण्यापेक्षां ते स्वार्थी दृष्टीनें जीवन कठूं लागलें. ज्यावेळीं त्यांची जनतेशी असलेली साहचर्यता ( Identification ) नष्ट झाली, त्यावेळींच समाजव्यवस्थेचा समतोलपणा ढळला. यामुळें वर्णसंकराला प्रारंभ झाला. धर्माचें स्वरूप प्रदर्शनात्मक ह्मणून टिकलें होतें, परंतु त्यांतील पूर्वीच्या सरदारवर्गाची ईश्वरप्रेषित संदेशाची भावना व जबाबदारीची जाणीव लुप्त झाली होती. क्षात्रवृत्तीला कसाई व लुटारूवृत्तीप्रमाणें व्यवसायाचें स्वरूप प्राप्त झालें. ( Militarism meanwhile became a profession, often very much as butchery and burglary are professions). अलिकडेसच मानवतेच्या विचाराने व कडक शिस्तीच्या मार्गानें त्याला अल्पसे उदात्त स्वरूप प्राप्त झालें आहें, तरी तें विनाशक युद्धसामुग्री-मुळें अधिकच विघातक ठरत आहे.

आधुनिक युगांत तर शीलसंपन्न सरदारवर्ग समूळ नष्ट झाल्या सारखाच आहे. कांहीं देशांत रणक्षेत्रावरील पराक्रम व लोकोपयोगी

कार्य बहुमानानें व पदवीदानानें मान्यतेस पावतात. परन्तु हें सर्व प्राचीन वैभवशाली परंपरेचें निकृष्ट अवशेष होत. लष्करातील प्रवेश-परीक्षेखेरीज इतर सर्व परीक्षा बौद्धिक चाचणीवरच होत आहेत. शीलाची व समाजप्रियतेच्या परीक्षेचे रूपातर विचारशक्ती व स्मरण-शक्तींच्या परीक्षेंत झालें. प्रत्यक्ष कृतीच्या परीक्षेचें रूपातर लेखी परी-क्षेंत झालें. याला उपाध्यायवर्गच तेवढा काय तो अपवादात्मक ठरतो. अर्थात जेथें हिंदुधर्माप्रमाणें अनुवंशिकतेच्या गुणाला प्रभुत्व प्राप्त झालें तेथें हा वर्ग टीकाव धरून आहे, त्याखेरीज इतर सर्वत्र बहुतेक नष्ट-प्रायच झाला आहे.

जसजशी सरदारवर्गाच्या जीवनात स्वार्थदृष्टी येऊं लागली तस-तसा तो वर्ग निरनिराळ्या प्रकारें लाचखाऊ बनला व लोकाना जाचक होऊं लागला. त्याच्या जीवनपद्धतीनें जनतेंत असमाधानवृत्ती पसरूं लागली. आणि ज्या देशात ते सरदारवर्गाच्या सत्यमार्गापासून बरेंच भ्रष्ट झालें त्या त्या देशात क्रान्तीचा स्फोट झाला. फ्रान्सनें याचा प्रारंभ केला. त्या कालापुरता फ्रेंच राज्यक्रान्तीनें युरोपांतील सामाजिक कलह थांबविला, परंतु औद्योगिक क्रान्ती व यंत्रयुग यायोगानें मान-वाची पिळणूक करणारे व सामाजिक विग्रह वाढविणारे नवीन प्रश्न उद्भवले. कल्पनासृष्टींत असलेलें स्वातंत्र्याचें व मानवी मूल्याचें विचार व्यवहारांत आणणारे पहिलें जर कोणी असतील तर तें उदारमतवादी होत. याच उदारमतवादी लोकांनीं समाजवादी लोकांना मार्ग घालून दिला. व यामुळेच जो कामगारवर्ग दबला गेला होता व पिळला जात होता तो आपल्या मागण्यांचा डांगोरा पिटूं लागला.

धर्मपीठानें जें कार्य उच्चवर्णाचें नाहीं अशी राजकीय सत्ता कांहीं कालपर्यंत उपभोगिली. हिंदुस्थानांत मात्र ब्राह्मणांची अशी राजकीय सत्ता कधींच नव्हती. युरोपमध्यें एकदा धर्मपीठाकडे पूर्ण सत्ता होती. परंतु पुढील कालात त्याच्या हातातील राजकीय सत्ता बहुतेक देशांत नाहीशी झाली, तरी पण रोमन कॅथॉलिक देशात व रशियांत त्यानें आपली राजकीय किंवा सामाजिक सत्ता मात्र बरीच चालविली. कांहीं ठिकाणीं या सत्तेला सामाजिक दडपशाहीचें स्वरूप प्राप्त झालें. फ्रान्समधील जेस्वीट पंथाविरुद्ध चळवळ, रशियन राज्यक्रान्ती व अलिकडील प्रथमावस्थेंतील स्पेनमधील बंड ही सर्व याचीच उदाहरणें होत. अर्थात् शेवटची दोन अल्पप्रमाणावरील उदाहरणें आहेत.

कालाच्या ओघात धार्मिक वर्ग व शासकवर्ग हें दोन उच्चदर्जाचें सांस्कृतिक वर्ग आपल्या सामाजिक कार्यापासून च्युत झालें. यामुळें कांहीं देशात वर्णसकरानें समाजातील समतोलपणा इतक्या निकृष्टावस्थेला जाऊन पोहोचला कीं, साधारण उपाययोजनेनें ती स्थिती सुधारण्याची शक्यता राहिली नाहीं. ह्मणूनच क्रान्ती अपरिहार्य ठरली. पण कांहीं देशांत मात्र सामाजिक संबंध इतक्या निकृष्टावस्थेला गेलें नव्हतें.

परंतु एवढें मात्र खरें कीं समाजाचें जीवनाला खरें ब्राह्मण व खरे क्षत्रिय तसेंच अध्यात्मिक, शैक्षणिक व राजकीय दृष्ट्या शीलसंपन्न वर्ग हें अत्यंत आवश्यक घटक आहेत—(**But society cannot get along without its true Brahmanas and its true Kshatriyas, without its spiritual-educational and its political leaders of nobility of character.)**

खालच्या वर्गांतील लोक त्याना योग्य न्याय मिळावा ह्मणून ओरड करूं लागले, आणि तेही खरेंच होतें. परंतु जेथें सामान्य जनता स्वैरसंचार करूं लागली तेथें मात्र ती जनता अधःपाताच्या खोल दरींत घसरूं लागली. आणि जेथें जेथें जनतेला दाबात ठेवण्यांत आलें व जेथें अशाप्रकारची जनता अल्पसंख्याक होती तेथें तेथें कालाच्या ओघांत ज्यावेळीं त्याचे मुख्य उद्देश सफल झालें, त्यावेळीं त्यातील पुढारीवर्ग भिक्षुवृत्तीनें राहूं लागला.

शासनसत्ता प्रथमतः सरदारवर्गाच्या हातात होती. नंतर तिचें संक्रमण औद्योगिक वर्गाच्या व भांडवलशाहीच्या हातीं झालें. तदनंतर ही सत्ता कामगारवर्गाची होऊं पाहण्यास प्रयत्न करूं लागली व कांहीं देशात कामगारवर्गाची सत्ता अस्तित्वातही आली.

परंतु मानवी व्यवहाराचें अनुशासन व नियमन करण्याचें अवघड कार्य करण्यासाठी जे शीलसंपन्न व कर्तृत्ववान् आहेत आणि ज्याचा कोणत्याही विशिष्ट संघाशीं वैयक्तिक प्रेमभाव किंवा इतर संघाशीं द्वेषभाव नाहीं अशा लोकाची आवश्यकता आहे. भांडवलशाही व कामगारवर्ग याच्या शासनसंस्थेविरूद्ध समाजात प्रतिक्रिया होण्याला वरिष्ठ शासकवर्गांतील कांहीं लोकांनीं इतर दोन वर्गांच्या हातांतील शासन सत्ता काढून घेण्याचें प्रयत्न कारणीभूत झालें.

सोव्हियट रशिया हें याचें एक उदाहरण होय. सध्यां स्वतंत्र झालेले लोक व त्यांचें पुढारी यांना मात्र स्टॅलिननें आपल्या सत्तेच्या दाबात ठेवलें आहेत. अशा प्रकारची घटना अपरिहार्यच होती. यापेक्षां फॅसिस्ट राष्ट्राचें उदाहरण थोडें सरस आहे. फॅसिझम् व राष्ट्रीयसमाजसत्तावाद या चळ-

वळी म्हणजे शासकवर्गांतीलच कांहीं पुढाऱ्यांनीं शासनसंस्थेमधील वर्ण-संकर घालविण्याचें केलेलें प्रयत्न होत. उत्पादक वर्गांतील व वैश्य-वर्गांतील कांहीं व्यक्तींनीं शासनसंस्थेची धुरा आपल्या खांद्यावर घेणें किंवा तिला ( शासनसंस्थेला ) मार्गदर्शक बनणें व त्या संस्थेवर टीकास्त्र सोडणें हें अनैसर्गिक होय. ज्या अकुशल कामगाराच्या तो ज्या कारखान्यांत काम करतो त्या कारखान्यांतील धोरणाबद्दलच्या मताला किंमत दिली जात नाहीं, त्याचें मत राज्यकारभारासारख्या विषयांत राज्यशास्त्राच्या प्राध्यापकाच्या मताबरोबरच गणलें जावें हें मात्र तर्कहीन आहे. या विसंगतपणाचें निराकरण करण्याकरतांच फॅसिझम् व राष्ट्रीयसमाजसत्तावाद हें सूज्ञपणाचें प्रयोग आहेत. बहुजनसमाजाच्या मतांवर व त्यांच्या हक्कांच्या जाणीवेवर अधिष्ठित असलेली पार्लमेंटरी पद्धत फॅसिस्ट व राष्ट्रीयसमाजवादी राष्ट्रांत नष्ट करण्यांत आली. पार्लमेंटरी पद्धत म्हणजे नुसती चर्पटपंजरी –( Parliamentarism, the "Ism of talking"). समाजाची प्रगति वर्णसंकराची वाद करण्यांत झाली, यामुळें त्या पद्धतीवर एकसत्ताक पद्धतीनें कुरघोडी केली.

येथपर्यंत झालें तें कदाचित् बरोबर असेलही. परंतु या वरील दोन्ही राज्यपद्धतींत दोन दोष मात्र आढळतात– ( हेच दोष रशियन राज्यपद्धतींतही आहेत ). मानवी स्वातंत्र्याचें ध्येय अभ्रमपणानें दूर लोटण्यांत आलें. जरी त्याचें मन त्याला कांहीं तरी व्यवहार्य व सुसंगत अशी प्रेरणा करीत असलें तरी आधुनिक मानव हा अंतर्यामीं लोकशाहीचा अभिमानी आहे. दीर्घप्रयत्नानें व अतिकष्टानें

प्राप्त झालेल्या स्वातंत्र्याच्या व व्यक्तिमहात्म्याच्या मानवतेच्या हक्कांची पायमल्ली इतक्या सुलभ रीतीनें व्हावी हें दृश्य पाहणें त्याच्या जीवावर येतें. हें कृत्य त्याच्या भावनाना पटत नाहीं. पहिल्या दोषांतून उद्भूत झालेला दुसरा दोष हा आहे कीं, सत्ताधारी शासकवर्ग आपल्या सत्तेच्या मदावर्तेत बहुजनाच्या विवेकबुद्धीलाही विशिष्ट वळण देऊं लागला. जातिपेक्षा राष्ट्र श्रेष्ठ व त्या राष्ट्राचा अधिकारी वर्ग हा जीविताच्या सर्व कार्यक्षेत्रांत सर्वसत्ताधारी होय अशा प्रकारची या राष्ट्रानीं घोषणा केली. परंतु ज्याप्रमाणें धर्मपीठानें ऐहिक सत्तेचा अभिलाष धरूं नये हें खरें, त्याचप्रमाणें ऐहिक सत्ताधाऱ्यानें अध्यात्मिक सत्तेची आकांक्षा धरूं नये हेंही तितकेंच खरें. ऐहिक व धार्मिक सत्तेची कार्यक्षेत्रें ठरविणारी अशी एक योग्य सीमारेषा मुसोलिनीनें दाखवून दिली हें त्याला भूषणावहच आहे; आणि अशा रीतीनें त्यानें त्या दोन्ही सत्तेंत पुष्कळ कालापासून चालत आलेल्या कलहाला मूठमाती दिली व त्याचे व पोपचे संबंधही स्नेहाचे आहेत. या सर्व कार्यावरून त्याचा मुत्सद्दीपणा दृष्टोत्पत्तीस येतो.

जर्मनीविषयीं असेंच ह्मणणें शक्य नाहीं. नाझी सत्तेच्या प्रारंभापासूनच त्या राज्यसंस्थेनें राष्ट्रीयसमाजसत्तावाद ( National-Socialism ) हेंच जीविताचें तत्वज्ञान, हिटलर त्याचा संस्थापक, व हाच आपला धर्म असें जनतेनें मान्य करावें याबद्दल दीर्घ प्रयत्न करण्यात आले. याचप्रमाणें कॅथॉलिक व प्रोटेस्टंट धर्मपीठानें आपल्यापुढें मान तुकवावी व आपल्या आज्ञा शिरसावंद्य मानाव्या अशाप्रकारचे सतत प्रयत्न करण्यात आले. सोव्हियट रशियात तर यापेक्षाही

निकृष्ट स्थिती आहे, कारण लेनिननें ह्मटलें आहे कीं, 'जडवाद हेंच आमचें राजकीय तत्वज्ञान आहे' (Materialism is the official philosophy.). रशियात धर्मपीठांचे पुष्कळ वर्षांच्या धार्मिक छळानें शुद्धीकरण झालें होतें तरी पंचवार्षिक योजनेंत धार्मिक संस्थेचा व धर्माचा सावकाश व पद्धतशीर उच्छेद करण्याचा कार्यक्रम आखण्यात आला होता. परंतु समजलेल्या माहितीवरून असें ह्मणण्यास हरकत नाहीं कीं, योजनेच्या शेवटच्या काळात रशियात धार्मिक स्वातंत्र्याचें पुनरुज्जीवन झालें होतें.

वर उल्लेखिलेल्या राष्ट्रात शासक व व्यवस्थापक वर्गाची सत्ता 'कोऽन्योऽस्ति सदृशो मया' या अवस्थेपर्यंत चढली. आपल्या वर्गापेक्षां उच्च दर्जाचा, शासकवर्गाला व समाजाला मार्गदर्शक व उपदेशक ठरलेला असा एक वर्ग आहे याकडे दुर्लक्ष करण्यात आलें. प्राचीन राज्य-व्यवस्थेमध्यें उपाध्याय किंवा ऋषिवर्ग हाच सिंहासनामागील सूत्रधार व संचालक असे. त्यानें जरी शासन केलें नाहीं तरी त्याची टीका विचारांत घेतली जात असे. हिंदुस्थानात मात्र ब्राह्मणवर्गाचें व शासकवर्गाचें संबंध सलोख्याचें व सेमटाचें होते. तसेंच बुद्धभिक्षु व तत्कालीन राजे यांचे संबंधही स्नेहाचेच होते.

एखाद्या तत्वज्ञानात्मकसंस्था, किंवा पंथ किंवा चर्च यानें राष्ट्रांला आज्ञा सोडाव्यात हें योग्य नव्हे, कारण वर्णसंकर जर झाला असेल तर अशाप्रकारची संस्था उच्च दर्जाचीच आहे अशाप्रकारची खात्री देणें अशक्य आहे. प्रस्थापित झालेल्या धर्मात खालच्या वर्गाच्या लोकांचा सुद्धा भरणा होत असतो. कारण सध्या अशीच स्थिती आहे.

रशियांत वरिष्ट वर्गाचें ह्मणणें ऐकलेंच गेलें नाहीं, कारण त्यापैकीं पुष्कळजण क्रान्तिच्या वेळीं मारले गेले व काहींनीं पलायन केलें. या अस्तंगत वर्गाच्या जागीं नवा बुद्धीमान् शासकवर्ग निर्माण झाला. जर्मनीमध्यें ( तसेंच थोड्याफार प्रमाणांत इटलीमध्येंही ) उच्चवर्ग चिरडून टाकण्यांत आला व त्याच्या ह्मणण्याकडे दुर्लक्ष करण्यांत आलें. याच कारणास्तव त्यांची राष्ट्रीयतेची दृष्टी आकुंचित झाली. उच्चवर्ग मानवांतील बंधुत्वभावना जागृत करतो, कारण तो मूलतः अंतर राष्ट्रीय विचाराचा असतो. हा वर्ग चढाईचें धोरण कधींही स्वीकारीत नाहीं. युद्ध व लूट यांचें चहाते आपण या वर्गांत समाविष्ट होत नाहीं असें जाहीरपणें सांगतात. या उच्चवर्गांतील विज्ञानशास्त्राच्या अभ्यासकांनीं या वर्गाचें विश्वव्यापकत्व निदर्शनास आणून दिलें आहे. हा विज्ञान-शास्त्रांच्या अभ्यासकांचा वर्ग अत्यंत अंतरराष्ट्रीय स्वरूपाचा आहे. या शास्त्राचें अमेरिकन, जपानी किंवा यूरोपियन असें निरनिराळें विभाग नाहींत. एकच विज्ञानशास्त्र आहे. प्रत्येक वैज्ञानिक जगांतील इतर भागांतील वैज्ञानिकांनीं लावलेल्या शोधाचा उपयोग करून घेतो. अलिकडेसच एक अत्यंत गर्हणीय चमत्कार उघडकीस आला आहे. तो ह्मणजे नाझीशाहीला उपयुक्त असें जर्मनशास्त्र हा होय. याचें मुख्य लक्षण जर्मनीच्या यहूदी-आर्य यांतील वंशवादाच्या व कायद्याच्या स्वरूपाविषयीं आहे. या नवीन प्रकाराच्या निषेधार्थ जगांतील शास्त्रीय व शैक्षणिक संस्थांनीं जर्मनींतील शास्त्रज्ञांच्या परिषदेला व इतर कार्य-क्रमाला आपलें प्रतिनिधी पाठविण्याचें नाकारलें.

ज्याअर्थीं राष्ट्रीयसमाजसत्तावाद व फॅसिझम् या पद्धतींतील मूलभूत दोषांचें आविष्करण करण्यात आलें, त्याअर्थीं त्यांच्या संपूर्ण आर्थिक सत्तेचें ( the economic policy of antarchy ) किंवा स्वयंपूर्ण अशाप्रकारचें आर्थिक धोरण ( economic self-sufficiency ) याचा उल्लेख केल्यास तें अप्रस्तुत ठरणार नाहीं. या धोरणाच्या मुळाशीं मुख्य गोष्ट ही आहे कीं भावी कालात होणाऱ्या युद्धांत आपण बहिर्जगावर अवलंबून न राहता स्वतंत्र राहीलें पाहीजे, ही इच्छा. या धोरणामुळें शेतीला व इतर धंद्याना दिखाऊ स्वरूपाचें संरक्षण दिलें जातें. याशिवाय या धोरणामुळें इतर प्रतिनिधीस्वरूप मालांची ( Substitutes ) भरतीच वाढ होतें. याचें उदाहरण नुकतेंच जर्मनीमध्यें घडलें. लाकडापासून तयार केलेली लोकरच सर्वांनीं वापरली पाहिजे असा प्रचार व जबरदस्ती करण्यात आली. तिला झेलवुल ( Zellwolle ) ह्मणतात. या लोकरीची इतर चांगल्या लोकरीपेक्षां किंमत अधिक, गुणानें कनिष्ट, व वापरावयास अत्यंत वाईट असें असून ही तेथील सरकारनें असा कायदाच केला कीं, यापुढें लोकरीच्या मालात याप्रकारची लोकर थोड्याफार प्रमाणात वापरण्यात यावी व दुकानदारावर मात्र त्यांनीं आपल्या दुकानातून खऱ्या व शुद्ध लोकरीची कोणत्याही प्रकारें प्रदर्शन किंवा जाहिरातबाजी करूं नये असा निर्बंध घालण्यांत आला. एखाद्या वेळेस असेंही घडतें कीं, मूळ मालापेक्षा त्याच्या प्रतिनिधीस्वरूपाचा माल स्वस्त पडतो व चांगलाही ठरतो. जगांत आर्थिक स्वायत्तता आढळून येतें व हें धोरण वरील दोन राष्ट्रांचेंच वैशिष्ट्य आहे असेंही नव्हे. रशियासारखें राष्ट्र, एखादा स्वंद्वा-

प्रमाणें त्याचा विस्तार असल्यामुळें वरील तत्त्व थोड्याफार प्रमाणात अमलांत आणूं शकेल, तथापि या प्रकारच्या धोरणाला विशेष महत्व दिलें गेलें नाहीं, व कांहीं धान्य व इतर पदार्थांकरता इतर राष्ट्रावर अवलंबून राहण्याचें तत्त्व इतर राष्ट्रांशीं त्याच्या झालेल्या करारावरून स्पष्ट होत आहे.

लेखक ह्मणतो कीं, येथें एका गोष्टीचा उल्लेख करणें आवश्यक आहे. ज्या नवीन राजकीय पद्धतीवर विषयलक्षी दृष्टीने टीका केली त्या टीकेचा व माझा हिटलर-मुसोलिनी या व्यक्तींविषयींचा वैयक्तिक आदर याचा संबंध नाहीं. स्पष्टीकरण करणें एवढाच माझा हेतु, आणि या हेतुमध्यें व माझ्या वैयक्तिक भावनामध्यें तरी सार्वत्रिक हित साधणें याशिवाय दुसरा उद्देशच नाहीं. याशिवाय कोणाही विषयलक्षी निरीक्षकाला वरील महान् व्यक्तिद्वयानी आपापल्या राष्ट्रहिताच्या गोष्टी पुष्कळच केल्या हे कबूल करावें लागेलच. परंतु याचा अर्थ जशाप्रकारें त्या राष्ट्राच्या जनतेला समजाविला जातो कीं, त्याच्या राज्यपद्धती अत्यंत निर्दोषी आहेत, असा मात्र नव्हे. माझी अशी आशा आहे कीं या पद्धतींची योग्य वाढ होऊन त्या पद्धती त्या त्या राष्ट्राना उपयुक्त ठरून अशा उत्क्रान्त स्वरूपाला पोहोचतील कीं त्या जगताला सुद्धा उपयुक्त ठरतील.

राष्ट्रीयसमाजसत्तावादात्मक राज्यपद्धतींचें दोषाविष्करण झाल्यावर गुणानुवाद होणें ओघानेंच प्राप्त होतें. अर्थात् गुणविवेचनाला बराच काल लागेल, तरी अत्यंत ठळक गोष्टींचाच उल्लेख करणें बरें. अत्यंत महत्वाच्या गोष्टी जर कोणत्या असतील तर त्या ह्मणजे फ्युअररनीं जर्मन

जनतेमधील आत्मविश्वासाचें पुनरुज्जीवन केलें ही एक व दुसरी ह्मणजे युद्धोत्तरकालीन न्यूनगंडन्याच्या भावनेची जागा राष्ट्रीयतेच्या स्वाभिमानाच्या तेजस्वी भावनेनें भरून काढली ही होय, या त्या महत्वाच्या गोष्ट होत. समाजाचा नेता या दृष्टीनें त्यानें पुरुष व स्त्री याचें कौटुंबिक सेंद्रिय संबंध ओळखूनच सध्या दोन्हीमधील चालू असलेल्या समतेच्या चळवळीला विरोध केला. सर्वसाधारणतः असे मान्य झालें आहे की, कलेच्या प्रातांत कलेच्या दृष्टीनें राष्ट्राने हस्तक्षेप करणें हें अत्यंत आक्षेपार्ह आहे, तरी त्याच्या ( हिटलरच्या ) राजवटीनें संगीतकला व चित्रकला यात शिरलेल्या काही अनैसार्गिक गोष्टींना आळा बसला हें मात्र खरें. बहुविध दृष्टीनें त्यानें लोकापुढें नवीन आदर्श माडले. जर्मनीमधेंच सुट्टीच्या दिवशीं कोठें ना कोठें तरी सहल करावयास जावयाचें व केव्हा केव्हा दूरच्या देशात दर्यावर्दी सफर करावयाची अशा प्रकारच्या मोठ्या प्रमाणावरील नूतन उपक्रमानें त्यानें लोकाचें प्रेम संपादन केलें. कामगार वसतिची व्यवस्थित माडणी केल्यामुळें लोकाचें आरोग्य व श्रमजीवी वर्गाची श्रमशक्ती वाढली.

इतर देशात फॅसिस्ट पद्धतींतील दोषयुक्त विचाराना प्रतिक्रियात्मक उत्तर मिळण्याचें कारण ह्मणजे लोकशाही तत्वांचा प्रसार हें होय. सद्यःकालीन परस्पर प्रतिक्रियात्मक स्वरूपाच्या अशा विविध प्रकारच्या राजकीय चळवळींमध्यें सर्वसामान्यप्रकारची एक गोष्ट दृष्टोत्पत्तीस येते. ती ह्मणजे आपला शासकवर्ग सुस्वभावी व शीलसंपन्न असावा अशी जनतेची तीव्र इच्छा ही होय— ( It is a desire for integrity of character in its rulers ). प्रत्येक नवीन

पद्धतीच्या मुळाशीं जुन्या शासकवर्गाचा लाचखाऊपणा व दौर्बल्य इत्यादि गोष्टीविषयींचा तिरस्कारच दिसून येतो. मुसोलिनी व हिटलर यांच्या यशाची गुरुकिल्ली त्याच्या व्यक्तिमत्वाच्या मोहिनींत आहे–(The secret of the success of leaders like Mussolini and Hitler lies in the magic of their personality.). ते कांही ऋषी नाहींत परंतु आपल्या कल्पना–शक्तींना व्यवहार्यस्वरूप देणारे असें उत्कृष्ट कल्पक द्रष्टे आहेत. त्यांना अनुयायी मिळण्याचें मुख्य कारण ह्मणजे त्याची लोकावर छाप पाडण्याची हातोटी व यामुळें जनतेला असे वाटलें कीं, आपल्या आशा आकांक्षाच या मानवीस्वरूपात अवतीर्ण झाल्या आहेत कीं काय ही भावना हें होय. ते पवित्र जीवन कंठीत होते ह्मणून लोकांची त्यांच्या-बद्दलची आदरबुद्धी वाढली. ते शाकाहारी होते व त्यागवृत्तीनें रहात असून आपला बहुतेक काल वैयक्तिक सुखसोईकडे दुर्लक्ष करून सद्कार्याकडे व्यतीत करीत असत. अशा गोष्टींचा जनमनावर परिणाम झाल्यावाचून कधींही रहात नाहीं.

अशा प्रकारच्या पुढाऱ्यावर संकटपरंपरा कोसळणार हें ठरलेलेंच. मुख्य संकट ह्मणजे तो स्वताला सर्वाधिकारी ह्मणवून घेण्यास प्रारंभ करतो व यामुळें जनतेच्या मनांतून त्याचे उच्चाटन होतें व शेवटीं हेंच आत्मनाशास कारणीभूत होतें. जनतेनें दर्शविलेला आदर व प्रेमभाव याचा विपरीत अर्थ करून तो स्वताला सर्वज्ञ व सर्वसत्ताधीश समजूं लागतो व त्याची मजल येथपर्यंत जातें कीं, त्याला कोणीही–कोणा परकीयानीं सुद्धां–उलटून बोलता कामा नये. परंतु त्याला हें समजणें

आवश्यक आहे कीं, आधुनिक जगात सर्वाधिकारशाही ही गोष्ट सापेक्षतेनेंच ठरविली पाहिजे. अलेक्झांडर, रोमनसाम्राज्य, व चेंगीझखान याचे दिवस आता ल्याम गेले आहेत. हें जसें नेपोलियनला आपल्या अंतसमयी कळलें तसें याना आताच कळावयास पाहिजे.

अशाप्रकारच्या व्यक्तिच्या अमर्याद सत्तेच्या वाढीला तटबंद घालण्यास्तवच लोकशाहीप्रधान राष्ट्रात त्या त्या राष्ट्रातील अध्यक्ष, मुख्यमंत्री, किंवा गव्हर्नर इत्यादिकासारखे जे प्रमुख सत्ताधीश यांच्या अधिकारपदाला कायद्यानें किंवा परंपरागत रूढीनें विशिष्ट कालमर्यादेचें बंधन घालण्यात आलें आहे. हिटलर व मुसोलिनीप्रमाणेंच रूझवेल्ट हाही प्रमुख पुढारी आहे, परंतु आपण जरी असें गृहीत धरलें कीं, रूझवेल्टच्या स्वभावांत प्रक्षुब्ध परिस्थितीचा फायदा घेऊन इतर सुलतानशाहीप्रमाणें आपलें सर्वाधिकारी वर्चस्व स्थापन करावयाची इच्छा असली तरी अमेरिकन संयुक्त संस्थानाच्या राज्यपद्धतींत आमूलाग्र बदल झाल्यावांचून त्याला हा हेतु सिद्धीस नेणें शक्य नाहीं.

एकंदरींत सद्यःकालीन अखिल मानवजात शुद्धस्वरूपाच्या व उदात्त विचाराच्या पुढाऱ्याची अपेक्षा करीत आहे. मानवी अन्तःकरणांत अशा प्रकारचा एक गुण आहे कीं, तें उदात्त स्वभावधर्माच्या मानवाला आदरभाव दर्शविणें, व त्याची वीरपूजा करण्यास तत्पर होणें. हा बहुजन समाजाच्या मनाचा गुणधर्म प्राचीनच आहे, परंतु अलिकडे स्वपराक्रमाची स्तुती व स्वताला दुसऱ्याच्या बरोबरीचा समजण्याची प्रवृत्ति फार वाढल्यामुळें आता मागें पडला आहे. आधुनिक मानवाने आपली वीरवृत्ती रंगभूमिकडे, रूपेरीपडद्याकडे, शर्यतीच्या मैदानाकडे व

क्रीडांगणाकडे वळविली आहे. नैतिक व सामाजिक वीरवृत्तीला पीकाईच्या आकाश उड्डाणासारखें काही तरी भावनापूर्ण (sensational) असल्याशिवाय प्रतिष्टा मिळेनाशी झाली. कितीजण लुई पॅस्चर (Louis Pasteur,), डेव्हिड लिव्हिंगस्टन् ( David Livingstone ), डॉ. व मॅडम् क्यूरी ( Dr. & Madame Curie ), यांच्या कृत्यांची वाहवा करीत आहेत ? आधुनिक कालखंडात नेपोलियनसारखें वीर निर्माण व्हावेत किंवा मसायासारखें भावीकालांत होणाऱ्या वीराप्रमाणें वीर निर्माण व्हावेत अशी इच्छा असतें, कारण मानवी मनाची विभूतिपूजा करण्याची प्रवृत्ति काहीं काळ सुप्त झाली तरी लुप्त झालेली नसतें व संधि मिळताच ती काळ जागृत होतें.

सद्यःकालीं मात्र कोणी तरी आपला नेता असावा व आपण त्याचें आदरपूर्वक अनुयायित्व पत्करावें या मानवी मनाच्या प्रवृत्तिची जागृति होऊं लागली आहे. आधुनिक मानसशास्त्रीय संशोधनानें असा शोध लावला आहे कीं, ज्या विवक्षित कालात पुढारी निर्माण होतो, तत्कालीन राष्ट्रीय गरजा यांचा व उदयोन्मुख पुढाऱ्याचा निकटचा संबंध असतो. बहुजनसमाजाला आपल्या सुप्त व जागृत इच्छाच जणूं काय पुढाऱ्याच्या मूर्त स्वरूपात प्रगट झाल्या आहेत असें वाटतें. जनता पुढाऱ्यामध्यें पुढाऱ्याना लागणाऱ्या गुणाचा—ज्या गुणाना जनतेच्या मदतीच्या अभावीं अज्ञातवास पत्करावा लागला असता—अशा गुणाचा आरोप करतें. जो पुढारी निवडला जातो तो योग्य तऱ्हेनें किंवा सावधगिरीनें निवडला जात नाहीं कारण तो बहुजन समाजाच्या भावनावश मनावर आपली छाप पाडतो व या जोरावरच

तो निवडून येतो. मागणी तसा पुरवठा या तत्वानुसार हें घडून येतें. उलटपक्षीं स्वतःसिद्ध ( self styled ) पुढाऱ्याला त्याच्या प्रभावळींतील मित्राशिवाय इतर जनतेचा पाठिंबा मिळणें शक्य होत नाहीं. हेंच तत्व धार्मिक पुढाऱ्याच्या बाबतींतही लागूं पडतें.

समाज व व्यक्ति याच्यामध्यें सूक्ष्म प्रकारचें विविध मानसिक संबंध असतात. तसेंच व्यक्ति व विशिष्ट समाजसंघ याच्यामध्येंही तशाच प्रकारचें संबंध असतात. प्रत्येक व्यक्ती ही आपल्यापरी स्वतंत्र असतें, या प्राचीन सिद्धांताला आधुनिक संशोधनानें धक्का दिला आहे. आता समाज हा एक प्रकारचा मनोधर्मयुक्त असा समाज-पुरुष मानण्यात येत असून इतर व्यक्ति, त्या आपापल्याला स्वतंत्र समजत असल्या तरी, त्या समाजपुरुषाच्या इतर इंद्रियाप्रमाणें आहेत असें गृहीत धरलें जातें. प्रत्येक व्यक्ती आपल्याला स्वतंत्र मानीत असली तरी अंतरिक स्वरूपाच्या विविध सूक्ष्म बंधनानीं त्या परस्पर निगडित असतात हें लक्षांत ठेवणें आवश्यक आहे.

सध्या सर्वत्र अत्यंत महत्वाची गोष्ट जर कोणती दृष्टोत्पत्तीस येत असेल तर ती ही कीं प्रत्येक राष्ट्रातील समाज आपापल्या राष्ट्रीय भावनेनुसार त्या त्या राष्ट्रांतील मुसोलिनी, हिटलर, अतातुर्क, स्टॅलिन, सलाझार, रूझवेल्ट, इब्नसौद, क्युबाचा बॅटिस्टा अशा सर्वाधिकारी किंवा प्रमुख पुढाऱ्याना आदर दर्शवितात, व त्याच्यावर श्रद्धायुक्त अंतःकरणानें पूर्ण भाव ठेवतात. असाच आदर लेनिन व सन्-यत्-सेन या मृत पुढाऱ्याविषयीं सुद्धां होता. हिंदुस्थानातही महात्मा गांधी व पंडित जवाहरलाल सारख्या उच्च दर्जाच्या पुढाऱ्याविषयीं आदरभाव

प्रत्येकात वसत आहे. इतर देशातही हीच भावना त्या त्या राष्ट्रीय परंपरेनुसार व मनोधर्मानुसार वेगळ्या प्रकारे व्यक्त केली जाते. इंग्लड मध्यें नुक्तेंच राजघराण्याविषयीं किती लोकांचा भक्तिभाव होता याचें प्रदर्शन झालें. हॉलंडमध्ये राजकन्या ज्यूलियाना इच्या विवाहप्रसंगीं अशाच प्रकारचा राजघराण्याविषयीं प्रेमादराचा सोहळा झाला. याच प्रकारचें प्रसंग इतर देशातूनही दृष्टोत्पत्तीस येतात. लोकराज्याचें ( Republics ) राजशाहींत रूपांतर झालें आहे— जसें ग्रीसमध्यें घडून आलें, व तसेंच हंगेरीमध्येही घडणें अशक्य नाहीं.

सामाजिक हिताच्या दृष्टीनें प्राचीन राज्यपद्धतीचें पुनरपि अव-लंबन करणे हें योग्य ठरेल किंवा नाहीं हा एक विचारार्ह प्रश्नच आहे व त्याचें उत्तर ज्या राजाची अधिकारपदावर पुन्हा स्थापना होत आहे त्या राजे लोकाच्या वैयक्तिक चारित्र्यावर व स्वभावधर्मावरच अवलंबून राहील.

या विविध नवीन प्रकारात एका गोष्टीला मात्र मान्यता मिळाली आहे. ती ह्मणजे उच्चप्रकारच्या राजशाहीचें गुणाबद्दलची आस्था व त्याचें अनुयायित्व स्वीकारण्याची व आज्ञा मानण्याची उत्सुकता ही होय.

राजकीयदृष्ट्या व कायदे करण्याच्या दृष्टीनें प्रत्यक्षरीत्या मुळींच महत्वाची नसली तरी आधुनिक राजसंस्था ही सामाजिक दृष्ट्या अत्यंत महत्वाची आहे. ग्रेटब्रिटनमध्यें राजा व राणी हें पुरुष व स्त्री या जातींचें आदर्श मानव ह्मणून त्या राष्ट्रापुढें ठेवले जातात. ब्रिटिश परंपरेंत वाढलेल्या व साम्राज्यातील विविध कार्यक्षेत्रात वावरत असलेल्या बहुजन समाजावर या राजशाही दापत्याचा अप्रत्यक्ष परिणाम सामान्यतः

समजला जातो त्यापेक्षा अधिक प्रमाणात होतो. हॉलंडमधील ऑरेंजचें राजघराणें हें राष्ट्रीय स्वातंत्र्य, राष्ट्रीय ऐक्य, व साधेपणा, सहिष्णुता व उदारमतवादित्व इत्यादि राष्ट्रीय गुणधर्मांचें प्रतीक मानण्यात येतें. पक्षनिष्ठ राजकारणाव्यतिरिक्त, कोणत्याही " शाहीच्या " पलीकडे, व वंशनिष्ठ व इतर आधुनिक चळवळींपासून अलिप्त असा हा पुढारी आहे असें बहुजन समाजाच्या सूक्ष्म मनोधर्मानें ठरविलेलें असतें. मजूर पक्षाच्या एका पुढाऱ्यानें हें उघडपणें मान्यही केलें आहे.

उपरिनिर्दिष्ट राजे व बेल्जियम, स्कँडिनेव्हीया, बल्गेरिया, जपान, तसेंच हिंदुस्थानातील म्हैसूरचे व त्रावणकोरचे राजे हे सर्व खरोखरींच ' ईश्वर कृपेनेंच राजे झालेले आहेत--(" Rulers by the grace of God " ) व ते आपल्या वैयक्तिक आचरणानेंच प्रजेचे पालक व मार्गदर्शक ही जबाबदारी जाणतात हें स्पष्ट होत आहे. सध्याचा उच्च दर्जाचा राजा म्हणजे राजकीय सत्ताधारी पुरुष असा नसतो, परंतु तो तसा आहे असें कित्येक लेखकांचें म्हणणें आहे. याचा परिणाम कशा प्रकारचा होतो हें समाजाच्या मानसशास्त्रीय अभ्यासकाना मान्य करावेंच लागेल. वास्तविकदृष्ट्या अशा प्रकारें हे अभ्यासक लेओझेच्या 'अदृश्य' राजाचें ( un-noticed rulers ) पुनरुज्जीवन करतात, तर दुसरी कडे पक्षनिष्ठ राजकीय पक्ष आपल्या देशातील विशिष्ट पक्षाच्या व जातीच्या फायद्याकडे दृष्टी देऊन राजकारण चालवू पहातात, व अशा प्रकारें सार्वत्रिक मानवी कुटुंबाच्या हिताच्या दृष्टीनें एका मागून एक घोडचुका करतात. ते निंदास्पद ठरतात किंवा आदरास पात्र होतात तरी पण त्याच्यावरील जी राजसंस्था ती राष्ट्रातील शांततेचें व

अमर संस्कृतिचें प्रतीक ह्मणून कायम असतेंच व तीच वरील संस्थाच्या मध्यस्थीनें मानवी कुटुंबातील परस्पर स्नेहसंबंधाचें संवर्धन करीत असतें.

आधुनिक कालातील दुसरा एक चमत्कार पाहण्यासारखा आहे. पाश्चिमात्य देशातील लोकसत्ताक राज्यानीं व लोकराज्यानीं, ज्या प्राचीन पद्धतींतून तीं अवतीर्ण झालीं, त्या पद्धतींतील भपकेदारपणा, प्रतिष्ठितपणा इत्यादिकाचा त्याग केला आहे. परंतु सत्य वस्तुस्थिती अशी आहे कीं, त्या गोष्टींची मानसशास्त्रीय दृष्ट्या अत्यंत आवश्यकता आहे. पौर्वात्य राष्ट्रानीं आपलें ऐश्वर्यसंपन्नतेची भूषणें व भपकेदारपणा अद्याप टिकविला आहे, परंतु पाश्चात्य देशातील जीवन मात्र सामान्य स्वरूपाचें झालें आहे. बहुजनसमाजाच्या मनोधर्मांचा विचार करता या प्रकारच्या गोष्टींची अत्यंत आवश्यकता आहे. पाश्चात्य देशांत समतेच्या चळवळीची लाट ओसरल्यानंतर जनता प्राचीन वैभवशाली व कीर्तिप्रद अशा चालीरीतींचा विचार करू लागली. अशा प्रकारच्या विचारप्रवाहानें ग्रेटब्रिटन व जर्मनी सारख्या पुष्कळशा राष्ट्रात प्राचीन चालीरीतींचें पुनरुज्जीवन झालें.

ज्या नवीन राष्ट्रामध्यें प्राचीन परंपरेचा अभाव होता तेथें तेथें नवीन परंपरेचा प्रारंभ करण्यात आला. उदाहरणार्थ लोकराज्ययुक्त अशा समजल्या जाणाऱ्या अमेरिकेंत आपणाला किती तरी सामाजिक चमत्कार दृष्टोत्पत्तीस येतात. प्रत्येक महत्वाच्या स्थळीं लोकराज्याच्या भावविरहित अधिकारपरत्वें स्थापन झालेल्या स्वरूपाची अशी पुष्कळशीं गुप्त मंडळें आहेत. त्याचें ध्येय व हेतु सर्व प्रकारचें असतात. त्यांतील

बहुसंख्याक सभासद सप्ताहातील सहा दिवस टेबलावर काम करणाऱ्या कारकून वर्गांतीलच असतात. रविवारीं मात्र ते सर्व सभासद भपकेदार पोषाख किंवा अत्यंत प्राचीन प्रकारचा एखादा पोषाख करून संघामध्यें ( Clubs ) येतात. या पोषाखावर विक्षिप्त प्रकारची चिन्हें असतात. यावरूनच ते आपापसात एकमेकाना विविध प्रकारच्या पदव्या देतात, व अशाप्रकारें आपल्या मनाची करमणूक करून घेतात. त्याच्या अधिकाराच्या मर्यादा ठरविलेल्या असल्यामुळें त्याच्यात 'Super caveman' पासून ते King of Diamonds व Grand master of the Exalted order of the Mystic Point' इत्यादि प्रकारचें पदवीदान केलें जातें. हा सर्व करमणुकीचा खेळ आहे परंतु त्यांत गुंतागुंतीचें विधी मात्र फार आहेत, व त्याचा विचारही गंभीरतेनें केला जातो. वास्तविकरीत्या या प्रकारानें त्याच्या मनोधर्मांचें समाधान होतें. यायोगाने दैनंदिन जीवनातील वाटणारा कंटाळा, सामान्यपणा वगैरे निघून जातो व भपकेदारपणाचा अभाव घालविण्या-करता एका आनंदाच्या क्षणाचा उपभोग मिळतो. एखादा राजपुत्र जर अमेरिकेंत गेला तर त्याच्या पदव्यावरूनच त्याचा स्वागतसमारंभ मोठ्या थाटाचा होईल.

हें सर्व मूळ कार्याच्या अभावीं स्वीकारलेलें एक तंत्र आहे. म्हणून त्याचा मूळच्या कार्याइतका गांभीर्यानें विचार करूं नये असें मात्र नव्हे. हेंच तंत्र मूळ धरून स्वतंत्र कार्य होईल. सर्वत्र सर्वजण पुरुष व स्त्री भेदाभेद पहातात, पदव्याची लालसा बाळगतात, पुढाऱ्याना चाहतात व वीरपूजेचा स्वीकार करतात.

उपरिनिर्दिष्ट प्रकारच्या प्रवृत्तींना चेतावणी देणें किंवा त्या हीन लेखणें किंवा त्या तिरस्कारार्ह ठरविणें सांस्कृतिक दृष्ट्या उच्च वर्गांतील लोकांचे ह्मणजे समाजाचा मार्गदर्शक म्हणून जो वर्ग त्या वर्गाचें हें कार्य नव्हे; तर उलट त्यांनी ( पुढारीवर्गांनीं ) त्या प्रवृत्तींचा सांगोपांग विचार करून, त्यांना उदात्त स्वरूप देऊन व एकंदरींत त्यांना ' मानव्याचें अंतिम हित ' या ध्येयाचा आविष्कार करणारें एक उदात्त साधन म्हणून त्यांची योजना केली पाहिजे.

अलिकडे अलिकडे फॅसिस्ट, राष्ट्रीय समाजसत्तावादी, व तसेंच सोव्हियट रशियन या सरकारांनी आपलीं विस्तृत प्रमाणावरील भपकेदार प्रदर्शनें भरविलीं. लोकसत्ताक पद्धतींचे पुरस्कर्ते असल्यामुळें त्यांनीं संख्याबलावरच आपली छाप बसविण्याचा प्रयत्न केला. परंतु थोड्याच अवधींत शिस्तयुक्त संख्याबलाची जादू व नुसत्या साधेपणाच्या जोरावर केलेली उठावणी व भव्य आकार यांचा फोलपणा त्यांच्या लक्षांत आला. लोकसत्तेचे भोक्ते असल्यामुळें त्यांनीं त्यांच्या पुढाऱ्यांचें व्यक्तिमत्व व व्यक्तिमहात्म्य मात्र बरेंच वाढविलें.

नवीन राज्यपद्धती असलेल्या राष्ट्रामध्येंच अशा प्रकारचीं शासन संस्थेची कार्यें भावनाप्रधान जनतेच्या पाठिंब्यावर चालतात असें नव्हे. तर याच्या उलट पुरातन राज्यपद्धतींतर्हा प्राचीन रूढींचा प्रचार चालू असतो व त्या रूढींना पूर्वी किंवा थोड्या दिवसापूर्वी जितकी मान्यता मिळत नव्हती ती आता बरीच मान्यता मिळत आहे. ग्रेटब्रिटनमध्यें नुकत्याच झालेल्या राज्यारोहण समारंभानें तेथील जनतेवर अनपेक्षित अशी छाप पाडली व जनतेनें मोठ्या उत्साहानें व औत्सुक्यानें तो समारंभ साजरा केला.

आतां आपणाला अशी चिन्हें दिसत आहेत कीं, जगातील शासक वर्गाच्या सत्तेचें संक्रमण समाजाच्या सर्व वर्गांतून पुढें येणाऱ्या नवीन सरंजामशाही वर्गाकडे होत आहे. आपल्या पूर्वजाची जाणीव असलेलें असें फार अल्पसंख्याक लोक सरदारी घराण्यात मोडतात. बुद्धिमान वर्गांतूनच बहुसंख्य लोक पुढें येत आहेत. एवढेंच नव्हे तर कामगार वर्गांतूनही बरेंच लोक पुढें येत आहेत ही आनंदाची गोष्ट आहे. बहुसंख्याक वर्गांच्या पडद्यामागे लपलेला तिसरा वर्ण आतां पुनरपि आपला शासक व अंमलदार वर्ग बनवीत आहे. याचीच अत्यंत आवश्यकता आहे, व लोकाची अशीच इच्छा असून त्याचा पाठिंबाही आहे.

हेंच तत्त्व सांस्कृतिक दृष्टया उच्च असलेल्या वर्गाला लागूं आहे. सर्व धर्मांतून वैज्ञानिक, व साहित्यिक याच्या वर्गांतून व इतर प्रकारच्या वर्गांतून सत्याचा त्याच्या कोणत्या ना कोणत्या तरी अंगोपागाचा उपासक वर्ग निर्माण होत आहे. या वर्गाचें ब्रिनीचें स्वार हें मोठें वैज्ञानिक व साहित्यिक आहेत. व तसेंच कागावा ( Kagawa ) व महात्मा गांधी ( हें शासक वर्गांत मोडत नसून याच उच्च वर्गांत मोडतात. ) हे सुद्धा त्यातीलच. हा वर्ग मानसिक दृष्टया अंतरराष्ट्रीय आहे व अंतिम स्वरूपांत याच वर्गाच्या प्रसिद्ध व अप्रसिद्ध, ज्ञात व अज्ञात अशा प्रतिनिधींच्या प्रयत्नांवरच जागतिक शातिची स्थापना व जगद्राष्ट्राची प्रस्थापना अवलंबून आहेत.

वर वर्णिलेल्या प्रवृत्तींची समाजांत तद्विषयक जाणीव जसजशी वाढत जाईल तसतशी त्या प्रवृत्तींना पूर्णता प्राप्त होईल, व त्यांच्या

मुक्त आविष्काराला सुसंधि सापडेल. वस्तुतः असें होईल याबद्दल पूर्ण आशा बाळगणेंच योग्य होय.

मानवाच्या मनोवृत्तीला असें कळूं लागलें आहे व त्याला पुन्हां याचा अनुभव घेणें भाग पडेल कीं, समाजातील विविध वर्ग आणि जगांतील विविध वंश व निरनिराळीं राष्ट्रें हीं कांहीं परस्पर शत्रु नव्हेत तर सर्वांनीं सहकारी तत्त्वांवर अखिल मानवतेचें कल्याण हें साध्य साधण्यास्तव प्रयत्न करणें हेंच सुबुद्धीचें लक्षण होय. खरा सर्वराष्ट्रसंघ स्थापणें ह्मणजे अखिल जगताचे हित साधणें हेंच होय. सांस्कृतिक वर्गांना व त्यांच्या प्रयत्नांनीं इतर सर्व वर्गांना जोपर्यंत याची जाणीव होत नाही तोपर्यंत सामाजिक दुःखाना व सांस्कृतिक साधनांच्या विनाशाला कारणीभूत होणारी राष्ट्रीय व अंतरराष्ट्रीय हितसंबंध विषयक एकादी राजकीय प्रतिक्रिया टाळणें शक्य होणार नाहीं. हें तत्त्व मान्य केलेंच पाहिजे कीं, समाजांतील नैसर्गिक किंवा सांस्कृतिक असे जे चार वर्ग आहेत ते एकाच शरीरयष्टीचें निरनिराळे अवयव असून प्रत्येक अवयव शारीरिक आरोग्यासाठीं व एकदरीत हितासाठीं अत्यंत आवश्यक असून प्रत्येकानें आपापलीं कर्तव्यें योग्य रीतीनें पार पाडणें हेंच आत्यंतिक हितावह आहे.

जागतिक राजकारणांतील पुढील अवस्था, ज्यावेळीं जनता ती अवस्था येण्यास्तव व्यावहारिक दृष्टीचा आश्रय करील, त्यावेळीं अज्ञानी लोकांच्या टीकेपासून अलिप्त व अध्यात्मिक व बौद्धिक दृष्ट्या मार्गदर्शक अशा वर्गाकडून उपदिष्ट अशा प्रकारचा एक शासक व व्यवस्थापक वर्ग निर्माण होईल—ह्मणजे या राज्यपद्धतींत आधुनिक प्रचलित

पद्धतींतील सद्गुणाचा अन्तर्भाव होईल व त्यातील दोषाना टाळलें जाईल. ' मुद्रणस्वातंत्र्य अत्यंत आवश्यक आहे. तशीच वृत्तपत्रीय टीका सुद्धा ती जर सहिष्णुतायुक्त, उदारमतवादी, दोषदृष्टिवियुक्त, विधायक-स्वरूपाची, लोकमताचें योग्य दिग्दर्शन करणारी व उच्च वर्गीयाच्या टीकेप्रमाणें समाजावर छाप पाडणारी अशा स्वरूपाची असल्यास ती अत्यंत मौल्कि होय ' — The Press undoubtedly ought to be free, and its criticism, provided it is tolerant, liberal, unprejudiced and constructive and representative of public opinion as led by the higher cultural classes, is a most valuable socialising influence ). उलटपक्षीं सरकार एकाद्या विशिष्ट पक्षाकडून होणाऱ्या दुसऱ्या पक्षाच्या हिताविषयीं द्वेषी असलेल्या व सार्वत्रिक हिताचा विचारच न करणाऱ्या अशा लोकाकडून होणाऱ्या टीकेला प्रतिबंध करील. वृत्तपत्रें अत्यंत उपयुक्त असतील किंवा ती तितकीच समाज-विरोधी ठरतील. जर ती संस्था सांस्कृतिक वर्गाच्या हातात असेल तर ती अत्यंत हितावह ठरेल व जर ती अज्ञानजन्य मार्गावर व अशुद्ध स्वार्थदृष्टीनें प्रेरित झालेल्या लोकाच्या हातात असेल तर ती संस्था अनर्थावह व अहितप्रद ठरेल ह्मणजे तिचा वर्णसंकराशी संबंध असला पाहिजे असें होईल. तरी पण टीका ही काहीं अहितकारी ठरत नाहीं, जर ती ज्याना अनुसरून केलेली असतें त्याच्यापर्यंत, जनमतावर त्याचा विपरीत परिणाम न होता पोहोंचली तर. परंतु हीच तर त्यातील गोम आहे. ' वास्तविक दृष्ट्या मुद्रण स्वातंत्र्याचें नियंत्रण

हें सरकारच्या सामर्थ्यहीनत्वाचें द्योतकच होय ' ( Generally speaking, of course, curtailment of the freedom of the Press is a sign of weakness on the part of a government. ). वृत्तपत्रांतील पुढाऱ्याचें हास्योत्पादक व्यंगचित्रांचें चित्रण हें विधायकही असू शकतें, किंवा समाजविरोधीही असूं शकतें. त्यांना जर पुढाऱ्याच्या प्रतिष्ठेविषयीं व आदराविषयीं विपरीत भावना प्रसृत करावयाची असल्यास तें चित्रण समाजविरोधी ठरेल. ' या व्यंगचित्रांचें खरें कार्य पूर्वकालीन राजदरबारीं असणाऱ्या खुषमस्कऱ्या सारखें किंवा लेखकानें प्रस्तावनेंत उल्लेखिलेल्या दर्पणासारखें आहे. खरा खुषमस्कऱ्या जगातील गोष्टीपासून अलिप्त असतो व म्हणूनच त्याचा सांस्कृतिक वर्गातच समावेश होतो—(Their true function is really very much the same as that of the court-jester at courts of past ages, and like that of the mirror mentioned in the Introduction to this book. The perfect fool, who stands truly above the things of this world, is really a valuable member of the highest cultural class ! ).

यापुढील अवस्थेमध्यें मानवतेला हें अवगत होईल कीं, सांस्कृतिक विकासाच्या वरच्या वरच्या पायरीवर जाणें म्हणजे त्यांनीं अधिक स्वार्थत्यागी बनणें व तसेंच त्याची जीवनयात्रा वरच्या पायरीवर कष्टमय बनत असते याची जाणीव करून घेणें होय. यामुळें परिणामीं असें होईल कीं, जनता सामाजिक सोपानाच्या वरील वरील पायऱ्या ( म्हणजे अधिकार मिळण्यास व हक्कांचा उपभोग घेण्यास ) चढण्यास

अनुत्सुक राहील, परंतु उच्च दर्जा प्राप्त झाल्याबरोबर उच्च प्रकारच्या जबाबदाऱ्या अंगावर पडतात याची मात्र त्याना पूर्ण जाणीव होईल. अशा जाणीवेनें वर्णसंकराचें भय कमी होऊन वर्गसंबंध समाधानयुक्त व सहकारी तत्त्वावर अधिष्ठित राहतील व पूर्वीप्रमाणें वर्गकलह माजणार नाहीं. आधुनिक प्रवृत्ति अगदीं स्पष्ट आहेत. राजसत्ता तिच्यावरील जबाबदाऱ्या व तिचें व्यक्तिमत्व यामुळें अत्युत्कट स्वार्थत्यागाची बाब बनत आहे. राजाला राष्ट्रहित साधण्यास्तव आपल्या स्वप्रवृत्तींना बाजूला करणें भाग पडतें. वास्तविकरीत्या आदर्श राजसत्तेप्रमाणें दोन्ही गोष्टी एकरूप झाल्या पाहिजेत. जपानने तर राजसत्तेची तात्विक पद्धतीच तयार केली आहे, व ती पुन्हा अलिकडे अग्रेसर बनत आहे. ही पद्धति ह्मणजे कोडोचा ( Kwodo ) 'सार्वभौम मार्ग' ( Imperial Path ) अशी संज्ञा प्राप्त झालेला राजकीय तात्विक सिद्धांत होय.

राजसत्तेच्या आवश्यक करावयाच्या कार्याच्या मानानें पाहिल्यास रूझवेल्टसारखीं श्रम करणारी दुसरी कोणतीही सत्ताधीश व्यक्ति नाहीं. जेव्हां त्याच्या दैनंदिन कार्यक्रमाचें वृत्तात आपण वाचतो, तेव्हां आपणाला ही मानवी व्यक्ती इतक्या श्रमाचा बोजा कशी सहन करतें याचें आश्चर्य वाटतें. प्रभातकालीं शय्येवरून उठल्यापासून तो रात्रीचें दोन दोन तीन तीन वाजेपर्यंत तो अनिर्बंधपणें कार्यव्यापृत असतो व त्याला 'वैयक्तिक जीवन' —( personal life ) नाहींच असें दिसतें. अशा बाबतींत अधिकारस्वीकाराला कालमर्यादा असणें हे एकप्रकारे हितावहच आहे.

जर राजसत्तेचें जीवन अशाप्रकारें कष्टमय आहे, तर वरिष्ठ सांस्कृतिक वर्गाचें जीवन कांहीं बाबतीत याहीपेक्षा कष्टतर असतें.

यापैकीं नैतिकदृष्टया शुद्ध व उदात्त वृत्तींच्या लोकांविषयींच अर्थात् बोलावयाचें आहे. हें सर्व पूर्णपणें ज्ञात होण्याकरता आपणाला हिंदु-धर्मग्रंथांत वर्णिलेलें खऱ्या ब्राह्मणांचें गुणविशेष अभ्यासणें अत्यंत आवश्यक आहे. याचें प्रमाण (Standard) इतकें उच्च ठरविलें गेलें होतें कीं, जो चारित्र्य व नैतिक बल यानें संपन्न नसे तो या वर्गांत आपला अंतर्भाव व्हावा अशी इच्छाच बाळगीत नसे. अनुवंशिकतेच्या निर्बंधानें (Law) ब्राह्मण्याच्या दर्जा सर्वत्र खालावला गेला. 'युरोपातील अनुवंशिक सरंजामशाहीप्रमाणेंच सामाजिक जबाबदारीपेक्षा सामाजिक हक्कावरच जास्त जोर देण्यात आला' -- (Just as was the case with the hereditary aristocracy in Europe, in the course of time there was a tendency to lay more stress on social privileges than on social responsibilities.)

आता पुन्हा राजसत्तेकडे वळू. भविष्यकालीन राजा हा आपली स्वेच्छा म्हणून राज्यकारभार चालविणार नाहीं, तर तो आपल्या उच्च जीवनाच्या गुणांमुळें व बहुजनाच्या एकमतानें राज्य करण्यास्तव निवडला गेला म्हणूनच राज्य चालवील. भावीकालात राज्यकारभाराची शासनपद्धति कोणती स्वीकारली जाईल याची काल्पनिक मांडणी करणें कठीण कार्य आहे. परंतु एवढें मात्र खरें कीं, भावी राज्यकारभाराची सत्ता अल्पसंख्याकाच्या हातीं राहील व तीही बहुतेक एकाच व्यक्तीच्या हातीं, कारण असें आहे कीं, सामाजिक घटनेंतील सांस्कृतिक व अधिकारपरत्वें ठरलेल्या वर्गरचनेचा नूतन आविष्कार करण्याकडे जगाची प्रवृत्ति होत आहे. या राजाला खऱ्या अर्थानें

राजा, अध्यक्ष, पुढारी, सार्वभौम बादशहा किंवा प्रधान यांपैकीं कोणतें ही नामाभिधान दिलें तर त्याचें विशेष महत्व नाहीं. या शब्दांना ज्या त्या राष्ट्रातील बहुजन समाजाच्या परंपरागत मनोभावनेच्या दृष्टीनें मानसशास्त्रीय महत्व आहे. एवढें मात्र खात्रीपूर्वक सांगतां येतें कीं, भावी राजा सर्ववर्गीय बहुमतानें व आपल्या स्वपराक्रमाच्या गुणावरच राज्यकारभार चालविणार. आतां मानवजातीला मात्र भ्रष्ट व सामर्थ्य-हीन राजाबद्दल तिरस्कार वाटूं लागला आहे.

सद्यःकालीन विविध प्रवृत्तींचा विचार केला असतां व त्यांचा तर्कदृष्टीनें विकास कसा होईल हें पाहिलें तर त्या प्रवृत्तींच्या पूर्ण विकसित स्वरूपाची परिणती जगद्राष्ट्र—स्थापनेंत होईल याबद्दल आशावादी असणें योग्य ठरेल. आधुनिक विविध प्रकारचें प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडविण्याची हीच एक गुरुकिल्ली होय. या भावी घटनेबद्दल निव्वळ काल्पनिक स्वप्न ह्मणून स्वस्थ न बसतां त्याच्या शक्यतेबद्दल व सनातन चालू असणाऱ्या युद्धप्रकार व सामाजिक गोंधळ यांचा नायनाट करण्याला हाच एक उत्कृष्ट उपाय आहे आणि यावरही यदाकदाचित् वरील कलहाचे दोन्ही प्रकार अवशिष्ट राहिलें तरी तें सध्यांप्रमाणें विशिष्ट प्रांत किंवा देशापुरतेंच मर्यादित स्वरूपाचें राहतील, या सर्व गोष्टीबद्दल आधुनिक मानवानें शांतपणें विचार करणें अत्यंत आवश्यक आहे.

गेल्या महायुद्धात जगाचें नुकसान किती झालें याचें सविस्तर वर्णन लेखकानें खालीलप्रमाणें दिलें आहे :—

" Clever calculators like Carlton Brown in ' The Fight ' are doing much service to humanity.

He came to the following conclusion. The gross direct expenses of the World War come to $ 32,080, 266, 986. × Dr. N. Murray Butler, however, calculated that the war cost in all 30 million human lives and 400 milliard dollars in goods. If those 400 milliard had been used for constructive purposes, it would have been possible to give a house to the value of $ 2500, furnished for $ 1000, on a piece of land of 2 hectare ( nearly 5 acres ) for a price of $ 250 per hectare, as a present to every family in the United States, Canada, Australia, England, Wales, Ireland, Scotland, France, Belgium, Germany and Russia. After this had been done there would have been sufficient money left to give to every town of above 200,000 inhabitants in all those countries, a library of $ 500,000 and a university of $ 10,000,000. And then there would have been left a sufficiently big sum to pay out of the 5 per cent. interest the Salaries of 125,000 lecturers and teachers and 125,000 nurses, to each $ 1000 a Year. And after all this had been done there would still have been left a sufficient sum to buy all the valuable possessions of France, and Belgium : all houses, farms, manufacturing works, churches, public buildings, railways etc., in those two countries in the year 1914."

× To get the amount in rupees, multiply by 2·68.

कार्लटन् ब्राऊन सारखें तज्ञ गणितज्ञ 'युद्ध' या पुस्तकद्वारें मानव्याची उत्कृष्ट सेवा करीत आहेत. यानें असा निर्णय काढिला आहे कीं, परवाच्या महायुद्धाचा एकंदर प्रत्यक्ष खर्च ३२,०८०,२६६, ९८६ डॉलर्स ( याच्या अडीचपट केल्यास रूपये होतात. ) आला. डॉ.एन. बटलर यानें तर सविस्तर हिशोबच दिला आहे. तो ह्मणतो कीं, युद्धाकरता युद्धमान राष्ट्राना तीन कोटी मानवी जीवित आणि चारशें अब्ज डॉलर्स किंमतीचा माल इतकी किंमत द्यावी लागली. जर ४०० अब्ज डॉलर्सचा विनियोग विधायक कार्याकडे केला असतां तर अमेरिकन संयुक्त संस्थानें, कानडा, ऑस्ट्रेलिया, इंग्लंड, वेल्स्, आयर्लंड, स्कॉटलंड, फ्रान्स, बेल्जियम, जर्मनी आणि रशिया इत्यादि राष्ट्रातील प्रत्येक कुटुंबाला २५०० डॉलर्स किंमतीचें, १००० डॉलर्सच्या सामानानें युक्त, ५ एकर ५०० डॉलर्स किंमतीच्या जमिनी-सह बक्षीस ह्मणून देता आलें असतें. इतकें झाल्यानंतरही रक्कम शिल्लक राहिली असती ती वरील राष्ट्रातील २ लाख लोकसंख्येच्या प्रत्येक शहरात ५ लाख डॉलर्स किंमतीचें एक ग्रंथालय आणि १ कोटी डॉलर्स किंमतीचें विश्वविद्यालय स्थापन करता आलें असतें. इतकेंही करून पुन्हा रक्कम जी शिल्लक उरतें तिच्या शेंकडा ५ व्याजातून १२५००० प्राध्यापकाना—शिक्षकाना व १२५००० दायांना वार्षिक प्रत्येकीं १००० डॉलर्स प्रमाणें वेतन देता आलें असतें. यावरही इतकी रक्कम शिल्लक राहिली असती कीं, त्या योगानें फ्रान्स व बेल्जियम मधील सर्व मूल्यवान वस्तूंना विकत घेता आलें असतें— ह्मणजे तेथील घरें, शेतें, कारखानें, ख्रिस्त मंदीरें, सार्वजनिक इमारती, रेल्वे इत्यादि सर्व वस्तु १९१४ सालीं विकत घेता आल्या असत्या."

जर आपण भावी कालांत घडणाऱ्या जागतिक महायुद्धाचा योग्य प्रतिबंध केला, ह्मणजे ते होऊं न दिलें, तरच वरील 'जर तर'चा व्यवहार्य उपयोग होईल व जर युद्ध टळलें तर वरील माहितीवरून जगाचा किती तरी उत्कृष्ट लाभ होईल. 'आपण' हा शब्दप्रयोग सामुदायिक या अर्थानेंच न वापरता वैयक्तिक दृष्टया सुध्दां वापरला आहे हे लक्षात ठेवणें आवश्यक आहे.

ध्येयवाद युद्धाला प्रतिबंध घालण्यात यशस्वी ठरला नाहीं कारण त्याचा उपयोग विपर्यस्त राष्ट्रीयवादाकडे ( Mistaken nationalism ) व समाजविरोधी ( anti-social ) हेतु साध्य होण्याकडे केला गेला. व्यवहारदृष्टी ( Common sense ) व शांत विचार ( cool calculation ) या गुणद्वयाच्या सहाय्यानेंच जगद्राष्ट्राची प्रस्थापना होणें अत्यंत यशस्वी ठरेल. 'बुद्धिमत्सु नराः श्रेष्ठाः' या योग्यतेच्या मानवानें जर आपल्या वैयक्तिक व सामाजिक हिताची जाणीव करून घेतली नाहीं तर तो अतःपर या पृथ्वी-प्रह्यावर आपलें स्थान कायम राखण्यास अयोग्यच ठरतो—( If man, the pre-eminently thinking being, is not able to realize his own interest, collective as well as individual, he is not worthy to occupy his position on this planet any longer ).

जेव्हां अधम मानव ( under-man ) आपल्या विनाशक मनोभावनेनें, विषारी वायु व अराजकतेच्या सहाय्यानें पाश्चात्य संस्कृतिचा शेवट करण्यात यशस्वी ठरेल, तेव्हांच भावी कालीन जागतिक राजकीय घटना जगद्राष्ट्राच्या स्वरूपांत

आविष्कृत होईल. या प्रकरणांत ज्या विविध प्रवृत्तींचा विचार केला गेला त्याच प्रवृत्तींना व्यवहार्य दृष्टीची जोड मिळाली तर भविष्यकाल चिंताजनक खास ठरणार नाहीं; उलट प्रत्येक मानवाला आपल्या आत्मविकासाची पूर्ण संधि देण्यात येईल.

सामुदायिक अन्तर्मनाच्या शक्तीच भावी कालाचा निर्णय देण्यास समर्थ ठरतील—( It is the powers in the Collective Unconscious that will decide the face of the future ). सामाजीकरणाला सहाय्यक ( Socializing ) व मानवतारक्षक ( Humanitarian ) मनोवृत्तींपेक्षां अर्धवट शक्ती श्रेष्ठ ठरेल काय ? असें होणें शक्य ठरत नाहीं. हें अधिक शक्य आहे कीं मानवी समाज हा बंधुत्व व सहकार्य या तत्त्वावर अधिष्ठित अशा नवयुगाचा प्रारंभ करीत आहे.

मध्यंतरी भावी जगद्राष्ट्राच्या ( World State ) कल्पनेचें मूर्तस्वरूप कसें असेल याबद्दल अनुमानें बांधण्यास सुरवात केली आहे. या प्रश्नाबद्दल आपण मूलभूत स्वरूपाचें काहीं विचार मांडू.

आदर्श घटनेच्या दृष्टीनें चार सांस्कृतिक वर्गाप्रमाणेच या जगद्राष्ट्र – स्वरूपातही मूलभूत अशी चार खातीं असणार.—

**(१) उत्पादन–खातें** ( Department of Production ):—जगांतील प्रत्येक विभागांतील उत्पादनाचें त्या त्या भागाच्या हवामान, साधनसंपत्ति, मनोधर्म, व उत्पादनाचा स्वरत दर इत्यादि गुणधर्मांनुसार व्यवस्था ठरविणारी आंतरराष्ट्रीय स्वरूपाचीही एक संस्था असावी. या खात्यानें आपला कारभार दुसऱ्या नंबरच्या खात्याशीं सहकारी

तत्त्वावर चालविला पाहिजे. हें दुसरें खातें म्हणजे (२) विभाजन–खातें–( Department of Distribution ):- ज्या ज्या राष्ट्राच्या गरजेप्रमाणें त्या त्या राष्ट्राला कच्चा माल व तयार माल पुरविणें हें या खात्याचें कार्य होय. याजाच जोडलेली अशी एक अंतरराष्ट्रीय बँकही असावी. (३) शासनसंस्था खातें:–( Department of college of Rulers ):-यात सर्व राष्ट्रांच्या श्रेष्ठ शास्त्याचा किंवा त्याच्या प्रतिनिधींचा अंतर्भाव असावा व याचें कार्य या प्रतिनिधीतीलच पाळीपाळीनें होणाऱ्या अध्यक्षाच्या नेतृत्वाखालीं चालावें किंवा उज्वल चारित्र्य, सूक्ष्मबुद्धी, आणि न्यायप्रियता एवगुणविशिष्ट अशा एकाद्या अंतरराष्ट्रीय व्यक्तीची अध्यक्षपदाकरता निवड करावी. ही संस्था वरील दोन्ही खात्यावरील पूर्ण अधिकारी सत्ता असावी आणि लोकसंख्येची वाढ व परस्पर राष्ट्रांतील जनतेचें देशांतर इत्यादि प्रश्नाबरोबरच अंतरराष्ट्रीय कलहाचा न्यायनिवाडा करणें हेही याचेंच कार्य असावें. (४) उपदेशक–खातें–( Advisory Department )– हें शुद्ध स्वरूपात उपदेशक खातें असावें. यात सर्व राष्ट्रांतील, धर्म, तत्वज्ञान, समाजशास्त्र, अर्थशास्त्र, मानसशास्त्र, शिक्षण, कला व ज्ञान इत्यादि ज्ञानशाखेतील तज्ज्ञ अशा व्यक्तींचा समावेश असावा. थोडक्यांत हें खातें म्हणजे ‘ अंतरराष्ट्रीय लोकसभा ’–( International Parliament ) या स्वरूपाचें असावें. समाजसेवेला वाहिलेली अशी सध्याच्या राष्ट्रसंघाची जी उपखातीं आहेत ती सर्व याच खात्याला जोडण्यांत यावीत म्हणजे हें एक प्रकारचें मोठ्या प्रमाणावरील ‘ रोटरी केंद्रच ( Rotary Centre ) बनेल. राष्ट्रीय व जागतिक संस्कृतिचें

संरक्षण व लोकमताचें मार्गदर्शन हें या संस्थेचें प्रमुख कार्य होय. एवढी मात्र काळजी घेणें आवश्यक आहे कीं, ही संस्था पूर्णतः सु-परिवर्तनीय ( flexible ) असावी व संघटनेचें कडक बंधन (orga-nizationalism ) आणि नोकरशाहीचे नियम व कार्यपद्धति ( the rule and line of St. Bureaucratius ) यापासून अत्यंत अलिप्त असावी.

जगद्राष्ट्राच्या संस्थापकापुढें जागतिक अर्थसंबंधाचें केंद्रीकरण करणें हें एक मोठें कार्य आहे. अन्तरराष्ट्रीय अर्थव्यवहार करणारी अशी अन्तरराष्ट्रीय बँक चालविणें अवघड आहे अशी कल्पना करणें चुकीचें ठरेल. ही बँक Clearing Bank ही असावी. ही बँक विविध राष्ट्रीय बँकाची जागा भरून काढील. सद्यःकालीन गुंतागुंतीच्या आर्थिक पद्धतिचें केंद्रीभूत अशा जागतिक पद्धतींत संक्रमण करावयाची योजना तयार करणें हें मात्र अत्यंत कठीण कार्य आहे. सध्यां प्रच-लित आहे त्याप्रमाणें भावी कालातील चलनपद्धति सुवर्णाधिष्ठित अशी राहील किंवा इतर पुष्कळशा अर्थशास्त्रज्ञांनीं सुचविल्याप्रमाणें त्याची जागा नायट्रोजन, तांदुळ, गहूं किंवा मानवी जीवित घेईल, परंतु संक्रमणावस्थेमध्यें मात्र बरीच अडचण उत्पन्न होणार आणि जर सुवर्णाच्या ऐवजी दुसरें मूल्य ठरविण्याचें प्रयोग करण्यांत आले तर ते न भूतो न भविष्यति अशी गुंतागुंत करण्यास कारणीभूत होतील. अशा योगानें अन्तरराष्ट्रीय अर्थसंबंध कदाचित् आपणाला सुवर्णमूल्या-शिवायच किंवा कोणत्याही एका वस्तुमूल्याशिवायच चालवावे लाग-तील, तरी पण याच्या ऐवजी दुसरें मूल्य उत्पन्न होईल व ते म्हणजे

उत्पादित माल किंवा आर्थिक वा सांस्कृतिक ठेवा— यांपैकीं प्रत्येक वस्तूचें मूल्य कमीजास्त होईल परंतु एकंदरींत सर्वसाधारणतः ते मल्य कायम स्वरूपाचेंच राहील.

सद्यःकालीं जागतिक प्रवृत्तींचा ओढा राष्ट्रवादाकडे बराच आहे. याचा परिणाम राष्ट्रसंघाच्या सर्व मान्यतेचा लोप होण्यांत बराच झाला. अंतरराष्ट्रीय न्यायमंदिरें बरीच मागासली गेलीं. वर वर्णिलेल्या दिशेनें कार्य करणाऱ्या पुष्कळशा व्यक्ती व चळवळी सध्यां चालू आहेत. कांहीं देशांत राष्ट्राची प्रतिष्ठा जातीपेक्षां अधिक करण्यांत आली व त्यायोगानें सर्वाधिकारी राष्ट्राप्रमाणें—( Totalitarian State ) त्याचें विघातक स्वरूपांत रूपांतर झालें. एकंदरींत जगद्राष्ट्राच्या कल्पनेवर राजकीयदृष्ट्या केंद्रीकरण ( Political Centralisation ) आणि स्थानिक स्वराज्याच्या ( Local Government ) दृष्टीनें विभक्तीकरण ( Decentralisation ) या दृष्टीनेंच थोडासा विश्वास ठेवतां येईल.

कांहीं बाबतींत औद्योगिक कार्यकर्त्यांचें ( Industrial magnates ) उपक्रमस्वातंत्र्य व सामर्थ्य यावर नियंत्रण घालण्यांत आलें असले तरी राष्ट्रें याबाबतींत प्रगतिपरच ठरलीं आहेत. परंतु कालाच्या ओघांत ती राष्ट्रें पूर्वीचाच चुकीचा मार्ग आक्रमूं लागतात व हा प्रश्न सोडविण्याचा एक उपाय म्हणजे वर दर्शविलेल्या चवथ्या खात्याच्या स्वरूपाची अंतरराष्ट्रीय संस्थेची स्थापना हाच होय.

जातां जाता थोडासा लोकशाहीचा विचार करूं. ज्या राष्ट्रांत लोकशाही घटना अयशस्वी ठरली व तिच्या ऐवजीं दुसऱ्या प्रयोगांचा

अवलंब करावा लागला किंवा कांहीं ठिकाणीं भ्रष्टस्वरूपाची (corrupt form) लोकशाही तशीच चालू राहिली, अशा प्रकारें ती अयशस्वी ठरली असली तरी लोकशाही घटनाच अद्याप सध्याच्या कालीं उत्कृष्ट व अत्यंत परिवर्तनीय ( flexible ) अशी एक घटना आहे. लोकशाही हा शब्दप्रयोग अद्याप सामान्य माणसांत चैतन्य उत्पन्न करतो कारण तो अन्तःकरणपूर्वक त्या तत्त्वाचा चाहता असून त्या चळवळीच्या यशाबद्दल कृतज्ञ असतो कारण लोकशाही पद्धति सुरक्षिततेची भावना उपत्न करते.

स्टॅलिनची नवी लोकसत्तात्मक राज्यघटना ह्मणजे दीर्घकाल चालत आलेल्या वस्तुस्थितीला नवी मान्यता असेंच दर्शविते. तीमुळें सार्वत्रिक मताधिकार ( Universal suffrage ) दिला गेला. परतु त्यांतही एकाच पक्षाच्या प्रतिनिधींनाच मतें द्यावयाची शक्यता ठेवली गेली आहे. यामुळें मतदाराना सर्वच प्रतिनिधी कम्युनिस्ट पक्षाचे विश्वसनीय सभासद आहेतच असा विश्वास असूनही ते प्रतिनिधींची निवड विशिष्ट व्यक्तिविशेषातूनच करतील असा संभवही आहे. या घटनेमध्यें मुद्रणस्वातंत्र्याची स्पष्ट घोषणा आहे. परंतु त्या मुद्रण स्वातंत्र्याचा अर्थ कोणत्या दृष्टीनें केला जातो कोणाला ठाऊक, कारण सोव्हियट वृत्तपत्राखेरीज इतर वृत्तपत्रांना सूर्यदर्शनच घडत नाहीं. धार्मिक स्वातंत्र्याचीही त्यात घोषणा व उल्लेख आहे, परंतु वास्तविक पाहतां धर्मविरोधी चळवळींना सहाय्य केलें जातें व धार्मिक प्रचारास प्रतिबंध करण्यांत येतो. यावरून हें स्पष्ट होतें कीं ही नाममात्र लोकशाही आहे. यावरून असें वाटतें कीं, आधुनिक कालानें तर अद्भुत अशा राज्यपद्धतींना जन्म दिला आहे.

ऑस्ट्रियातील प्रचलित पद्धति तर यापेक्षाही अद्भुततर आहे. ही पद्धति जगातील पूर्ण झोटिंगशाहीची निदर्शक आहे. मुसोलिनी, हिटलर व सध्याचा स्टॅलिन याना जनतेची नामधारी ( symbolic ) संमतिची तरी आवश्यकता भासतें. येथें ( ऑस्ट्रियात ) तर मतदान पद्धतिलाच मुळीं मूठमाती देण्यात आली आहे. तेथील अध्यक्षच लोकसभेचें ( Parliament ) सभासद, न्यायाधीश, सिव्हिल नौकर वगैरेंची नेमणूक करतो, त्याच्या हुकुमातच सर्व सत्ता आहे व तो वाटेल तेव्हा घटना सुद्धा बदलूं शकतो. हा सर्वसत्ताधीश शास्तासुद्धां लोकांकडून निवडला जात नाहीं. एकदा व्हियन्ना येथील एका सुज्ञ माणसानें म्हटलें कीं, ऑस्ट्रियाच्या घटनेमध्यें आणखी एक कलम घालावें म्हणजे बरें व तें असें कीं, अध्यक्ष जनतेला नेमतो ( The President nominates the people ) इतकें असूनही ऑस्ट्रिया एक उत्कृष्ट लोकशाही राष्ट्र म्हणूनच जगात गणलें जात आहे.

एखाद्या राष्ट्रात विशिष्ट प्रकारची ' शाही ' ( Ism ) अधिकारारूढ आहे किंवा प्रचलित आहे एवढ्यावरूनच आपणाला कांहीं ठरवितां येत नाहीं. जर अधिकारी वर्गातील लोक योग्यप्रकारचें असतील तर तें अत्यंत निकृष्ट पद्धतिलाही तोंड देतील, आणि जर अधिकारीवर्गच अत्यंत अयोग्य व हीन दर्जाचा असेल तर अत्यंत उत्कृष्ट पद्धतिसुद्धां सामाजिक शांततेची व समाजहिताची हमी देऊं शकणार नाहीं. उदाहरणार्थ—भांडवलशाहीच घ्या. भांडवलशाही काहीं चुकीची नाहीं तर त्या वर्गातील स्वार्थीवृत्तीचें असें अल्पसंख्याक व्यक्तिविशेष हेंच दोषास्पद होत. हेंच तत्त्व प्रत्येक ' शाहीला ' लागू आहे. परंतु

लोकांना आतां कळूं लागलें कीं, कोणत्याही विचारांना दोष देणें उचित नाहीं. त्यांना असें वाटतें कीं, जर दोषच द्यावयाचा असेल तर तो लोकांनाच त्यांच्या वैयक्तिक जीवनाबद्दल, त्यांच्या हेतुबद्दल व त्यांच्या कृतीबद्दल देणें योग्य होय.

ज्या देशांत राष्ट्रीय ऐक्याची बरीच वाढ बऱ्याच कालापासून झाली आहे, त्या राष्ट्रामध्येंच लोकशाहीचें कार्य उत्कृष्टपणें चालूं आहे. ज्या राष्ट्रामध्यें या प्रकारचें ऐक्य ह्मणजे अगदींच अलिकडील बाब ठरतें अशा जर्मनी व इटली या सारख्या राष्ट्रांना ही पद्धति योग्य अशी ठरली नाहीं. तेथें ती पद्धति विफल ठरली व तिनें फॅसिझमला मार्ग मोकळा करून दिला.

लोकसभा ( Parliament ) ही संस्था ती दोषयुक्त आहे तरी बरेंच उपयुक्त असें एक सार्वजनिक कार्यक्षेत्र आहे. यामुळें जनतेला कोणते सभासद योग्य विचार मांडूं शकतात, ते सभासद कशा प्रकारें जीवन व्यतीत करतात व त्याची वर्तणूक कशी आहे हें सर्व थोड्याफार प्रमाणांत चांगलें कळतें. ही संस्था जनतेच्या आशा–आकांक्षाचें प्रातिनिधिक स्वरूप दर्शविण्याव्यतिरिक्त भावी मंत्र्यांना व पुढाऱ्यांनाही शिक्षण देणारी एक प्रकारची शिक्षणसंस्थाच होय. सांस्कृतिक दृष्ट्या अधिकारपरत्वें ( cultural hierarchy ) केलेली वर्गरचना हिला मान्य नाहीं म्हणूनच हिच्यातील प्रमुख दोष सार्वत्रिक सारखा मताधिकार व बहुसंख्याक मतांना मान्यता या तत्त्वांतच दिसून येतात— (The main weakness of the system however, because it does not agree with the fact of the cultural

hierarchy, lies in the equality of vote and the majority principle ). बहुसंख्याकांचें सत्य म्हणजे सामर्थ्यवानाचें महात्म्य व सत्य होय व याला तात्त्विक आधारही कांहीं नाहीं. जर पक्षनिष्ट पद्धतीवर मतदान झालें नाहीं तर असें म्हणतां येईल कीं, अल्पसंख्याकच आपल्या भावी धोरणांत व निर्णयांत खरें ठरतील, कारण उच्च सांस्कृतिक वर्गातील लोक अल्पसंख्याकच असणार. याचा अर्थ असा नव्हे कीं, मतदानातील समता व बहुसंख्याकांची मान्यता या तत्वांचा सांस्कृतिक दृष्टया व अधिकारपरत्वें झालेल्या वर्ग रचनेच्या तुलनेंत अगदीं सामान्य ठरणाऱ्या अशा फॅसिझम्, राष्ट्रीय समाजसत्तावाद, व कम्युनिझम् या तत्वांपुढें त्यांना कमी लेखावयाचें.

आधुनिक विविध लोकशाही पद्धतींतील राजसत्तापद्धति ( Monarchy ) प्रचलित असलेल्या देशांतच सामाजिक शांतता नांदत आहे असें दिसतें. * राजघराणें हें राष्ट्रीय परंपरेचें व संस्कृतिचें केंद्र बनतें व तो राष्ट्रीय जीवनाला राजकीय पक्षातीत असा एक जोरकस आधार असतो. ज्या देशामध्यें राजेलोक किंवा राजघराणें यांनीं आपल्या वैयक्तिक जीवनाचें प्रमाण ( Standard ) निकृष्ट करून किंवा पक्षनिष्ट राजकारणाच्या भोवऱ्यामध्यें सापडून जनतेचा पाठिंबा व आदर घालविला त्यांची उचलबागडीच झाली. जो राजा पक्ष, संघ, जात, वंश किंवा स्वधर्मबांधवांची प्रियता इत्यादि गोष्टी पासून अलिप्त राहतो तोच आपल्या जनतेचा खरा प्रतिनिधी बनतो.

---

* स्वित्झरलंड धरून. हें लोकसत्ताक असून त्या देशाला उच्च प्रकारची राष्ट्रीय परंपरा आहे.

राजसत्तापद्धतीचा दोष त्या पद्धतींतील वंशपरंपरा चालणाऱ्या अधिकारांत आहे. एकाद्याला त्याचा बाप राजा होता म्हणून राज्याधिकार देणें ही गोष्ट किती हास्यास्पद आहे. याच दोषामुळें कित्येक राजघराण्यांना राज्यत्याग करून देशोधडीला जावें लागलें व देशांत यादवी माजली. वंशपरंपरा राज्याधिकार संक्रमणाला कौटुंबिक स्वरूपाची मानसशास्त्रीय पार्श्वभूमि हाच एक बळवत्तर आधार आहे. याची उघड बाजू म्हणजे कौटुंबिक परंपरा आणि जी आता बऱ्याच महत्वाची आहे असें कळूं लागले आहे अशी दुसरी प्रच्छन्न बाजू.

हा दोष टाळण्याचा मुख्य उपाय म्हणजे पेरूमध्यें प्रघात होता तशाप्रकारची चारित्र्याची व बुद्धिसामर्थ्याची कसोटीची परीक्षा घेणें हाच होय, आणि राजाचें वंशजापैकीं, किंवा नातलगापैकीं जो अत्यंत योग्य ठरेल अशाचीच सांस्कृतिक उच्च वर्गांतील योग्य प्रतिनिधीकडून निवड करण्यात यावी. प्राचीन राष्ट्रामध्यें असें प्रकार बरेंच झालें, व सध्यां कांहीं लहान लहान पौर्वात्य संस्थानात प्रचलित आहेत.

जगद्राष्ट्राच्या प्रस्थापनेचा उपक्रम करणें हें मुख्यतः सद्यःकालीन राज्यकर्त्यांचें प्रमुख कार्य होय. राजेलोक, पुढारी व सर्वाधिकारी यांना आपलें नांव अजरामर करून ठेवण्यास व मानवजातीची उच्चप्रकारची कृतज्ञता संपादण्यास ही सुसंधि आहे. जगांतील अर्थशास्त्रज्ञांनीं प्रचलित आर्थिक पद्धतींतील दोषांचें स्पष्टीकरण केल्यामुळें व सुधारणेचें मार्ग सुचविल्यामुळें ते प्रशंसेस पात्र ठरले. परंतु एकाही राष्ट्रानें त्यांनी सुचविलेल्या मार्गाचा अवलंब करून अंतरराष्ट्रीय उदाहरण घालून दिले नाहीं.

नुकतेच बेल्जियमचा राजा लियोपोल्ड यानें जगामध्यें मानवी जीवन उच्चप्रकारचें असावें या ध्येयानें प्रेरित होऊन आपल्या प्रधानाला एक पत्र लिहून त्यांत असें सुचविलें होतें कीं, जागतिक अर्थकारणाच्या अभ्यासास वाहिलेली अशी एक संस्था स्थापन करावी. या संस्थेतील सर्व सभासद तज्ञ असावेत व त्यांची निवड पक्षनिष्ठ न होता त्यांच्या नांवलौकिक व बौद्धिक गुणश्रेष्ठता याच गुणांवर होईल व ही संस्था कोणत्याही एकराष्ट्रीय दृष्टीकोनापासून अलिप्त अशीच राहणार. जागतिक अर्थकारणाच्या संघटनेच्या तत्वांची मांडणी करणें व त्या मांडणीची सतत बदल पावणाऱ्या आर्थिक तत्वांशीं सांगड घालणें हेंच या संस्थेचें प्रमुख कार्य होय. ही संस्था स्थापनेचा आणखी एक उद्देश होता. तो असा कीं, त्याला अखिल मानवजातीला व विशेषतः पौर्वात्य राष्ट्रांना हें दाखवावयाचें होतें कीं, पाश्चात्य राष्ट्र सुद्धा ऐहिकतेच्या पार जाऊं शकतें, त्याला परस्परविरोधाची इच्छा नाहीं किंवा त्यामुळें ते कलहप्रियही होणार नाहीं व कच्चा माल, भांडवल व मजूरवर्ग इत्यादि प्रश्न मुळें राष्ट्राराष्ट्रामध्यें जो विरोध उत्पन्न होतो अशा प्रकारचें प्रश्न सोडविण्याचें बुद्धिनिष्ठ असें बरेंच मार्ग आहेत. यावरून तेजस्वी विचारसरणी स्पष्ट दिसतें व उज्वल भावीकालाचें हें स्पष्ट चिन्ह आहे असें वाटतें.

भावी कालांतील तरुण पिढीचें कार्याविषयीं लेखकानें मार्मिक उद्गार काढलें आहेत ते असेः—

" The future belongs to youth and to the youthful spirit of the older generations. It is the

young men of today who hold within their hands the first plans to the building material for the World State to come. May they realize their responsibility and their inexpressible privilege. May their hearts burn with the noble idealism to sacrifice all for that vision of a united humanity. May the scout of all races, the students of all nations, the young comrades of all the world join hands in building at this one Universail Temple of Humanity : the World-State. It is the supreme and ultimate need of man-kind. All needs are comprised in it, all ideals are subservient to it, all human striving is meant to lead up to it. "

" भविष्यकाल हा तरुणपिढीच्या व वृद्धपिढींतील तरुण मनोवृत्तींच्या हातांत आहे. भावी जगद्राष्ट्राच्या स्थापनेची योजना व सर्व साधनसंपत्ति आजच्या तरुणांच्या स्वाधीनच आहे. त्यांना त्यांच्या जबाबदारीची व हक्कांची जाणीव होवो. संयुक्त मानवी समाजाचें कल्पनासृष्टींतील दृश्य मूर्त स्वरूपांत अवतीर्ण झाल्याचें पाहण्याकरतां सर्वस्वाचा होम करावा लागला तरी हरकत नाहीं या ध्येयवादाची ज्योत सर्वांच्या अंतःकरणांत सदैव तेवत राहो. सर्व जातींचें स्वयंसेवक, सर्व राष्ट्रांचा विद्यार्थी वर्ग, जगातील सर्व तरुण भाईवर्ग हे सर्व जगद्राष्ट्ररूपीं मानव्याचें विश्वव्यापक मंदिर उभारण्यांत सुसंघटित होवोत. मानव जातीची ही अत्यंत श्रेष्ठ व अंतिम अशी गरज आहे. सर्व गरजांचा यांत समावेश आहे, सर्व ध्येयें यापेक्षां खालच्या दर्जाची

आहेत, व सर्व मानवी प्रयत्नांची परिणती यांतच होणें अत्यंत आवश्यक आहे."

आपल्या बालकांचें सतत लालन-पोषण करून मानवांना आपल्या ध्येयाची जाणीव करून देण्याचें त्यागपूर्ण तसेंच आल्हाद दायक असें कार्य आजच्या तरुण स्त्रियांवरच सोपविलें आहे. तसेंच त्या आपल्या मुलावर योग्य नजर ठेवतात व पुढें हीच बालकें शांतता, सुरक्षितता व संपन्नता यांचा आणि याचें फलरूप अशा धार्मिक, कलात्मक व वैज्ञानिक संस्कृतिचा उपभोग घेतात.

जगाला असें कळूं लागलें आहे कीं, ते अतृप्त आहे. ते सत्तत्व, तेज, प्रेम याकरतां, सुरक्षितता व सुसंगति याकरतां आणि स्थिर व सर्वंकष अशा ध्येयास्तव अतृप्त आहे. जगाला या अतृप्तिमुळें महान् प्रयास होत आहेत. या आर्थिक व राजकीय अडचणीच्या प्रसंगीं धर्म, आत्मप्रचीति, व पृथ्वीवरील स्वर्ग इत्यादि गोष्टींचा उल्लेख करणें अत्यंत उपहासास्पद ठरेल. परंतु मानवजातीला दैवी संपत्तीचा शोध आपल्या हृदयाभ्यंतरींच करावा लागणार. मानवजातीला आपल्या 'मानवता' या शरीरयष्टीच्या गूढार्थाचा पुनःप्रत्यय येईल. तिला आपल्या मनोधर्मांचें सूक्ष्म संशोधन करणें भाग पडेल. प्रत्येक मानवाच्या सूक्ष्म मनांत चातुर्वर्ण्य आपल्या आत्मविकासाची प्रतिक्षा पाहात आहे हेंही कळून येईल. जातीमध्येंच सांस्कृतिक वर्गरचना सेंद्रिय रचनेप्रमाणेंच आवश्यक आहे हेंही कळेल. हजारों प्रकारचें बाह्य भेद असलें तरी मानवी कुटुंब हें अंतःकरणस्वरूपांत सारखेंच व ऐक्यरूपच आहे. या पृथ्वीतलावर जितकें मानव तितके मार्ग — किंवा जितक्या मूर्ती

तितक्या प्रकृति आहेत तथापि सार्वत्रिक हित एकच आहे व सार्वत्रिक ध्येयही एकच आहे.

थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे मानवानें आपला आधारस्तंभ अंतःकरणांतच शोधावयाचा आहे. त्या आधारस्तंभरूपी दीपस्तंभाच्या सहाय्यानेंच त्याचें ध्येय त्याच्या दृष्टीपथांत येईल, व तो त्या मार्गानें प्रयत्न करावयास उद्युक्त होईल. अशा योगानें तो जगाचा दास बनण्या-ऐवजीं स्वामी बनेल. तदनंतरची अवस्था ह्मणजे सर्वसुखाचीच स्थिती होय.

मानवानें याप्रकारें प्रारंभ केला ह्मणजे मग तो त्या मार्गाला लागला.

" तेव्हां आपणाला जें कांहीं करावयाचें तें वर्तमानकालींच, वर्तमानकालींच आपण कांहीं तरी करूं शकूं. आतांच आपण कांहीं तरी विधायक करूं शकूं. आतांच आपण कांहीं गोष्टींना जन्म देऊं शकूं. कालातीत जे आहे त्याचा अनुभव वर्तमानकालांतच आपणाला येऊं शकेल. वर्तमानकालांतच आपण आनंदाचा, सुखाचा व परमानंदाचा अनुभव घेऊं शकूं "

" वर्तमानकाल फार सूक्ष्मस्वरूप आहे. तथापि तोच सत्यस्वरूप आहे. भूतकाल तर आपल्या आटोक्याबाहेर गेला, भविष्यकाल कधीं येणारही नाहीं. परंतु वर्तमानकाल तर आपल्या हातांत आहे. तर मग आपण व्यवहारी बनूं. आपण आपल्या ठिकाणींच कार्य करण्यास आरंभ करूं व आपण आपलें स्वकर्तव्य करण्यानेंच कार्यास प्रारंभ करूं या. "

"It is only Now we can work. Only Now we can do something. Only Now we can build. Only Now we can create. Only Now we can experience that which is beyond time. Only Now we can feel pleasure – happiness – and Supreme joy."

"The Now is very subtle. Yet it is the only reality. The past is past help, the future may never come. But Now is at our disposal. Let us be practical – Now. Let us begin with working at our own self. Let us begin by doing our own job."



## परिशिष्ट ' अ

लेखकानें २४-६-४० ला लिहिलेल्या पत्रात खालील विचार पुस्तकांत समाविष्ट करावेत अशी विनंति केल्यावरून ते खालीं देत आहे:—

" हें पुस्तक लिहिल्यानंतर हिटलर व मुसोलिनी या सर्वाधिकाऱ्यांनीं आपल्या परराष्ट्रांवरील स्वाऱ्यांना आस्ट्रियापासून प्रारंभ केला. या व्यक्तींबद्दलच्या माझ्या विचारांत थोडा बदल झाला आहे. यांच्या पद्धतींची वाढ व विकास त्यांच्या राष्ट्रांना किंवा जगताला हितावह ठरतील असा मला विश्वास वाटत नाहीं. उलटपक्षीं, या पद्धतींची जगत्‌रूपी शरीरांत विघातक रोगाप्रमाणेंच वाढ होत आहे. हिटलरनें आपल्या देशाचें केलेलें कल्याण हे एखाद्या डाकू व खुनी माणसानें आपल्या मुलाबाळांचें कल्याण केल्यासारखें आहे. ( The good done by Hitler for his country is like the good done by a burglar and murderer to his own children. )

पुस्तकात मांडलेले इतर विचार व काढलेले निष्कर्ष मात्र जसेच्या तसेच कायम आहेत. उलट चालू परिस्थितीमुळें तर त्यांतील पुष्कळ विचारांना विशेषत्व प्राप्त झालें आहे. जागतिक प्रश्न सोडविण्याची आणि जागतिक शांततेची शेवटच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें जगद्राष्ट्र—स्थापना हीच गुरुकिल्ली आहे, याच्यावरील माझा दृढ विश्वास कायम आहे. थोड्या राष्ट्रांच्या राष्ट्रसंघानें किंवा थोड्या राष्ट्रांच्या संयुक्त संघटनेनें ( Federal Union ) हें कार्य होणार नाहीं; याकरिता जगद्राष्ट्रच – जागतिक संयुक्त संस्थानें ( United States of the World ) हाच बलवत्तर उपाय आहे. हें कल्पनाचित्र नसून सद्यःस्थितींतील अत्यंत निकडीची गरज आहे. हें सत्यसृष्टींत येणारच कारण तसें होणें अपरिहार्य आहे. "

———

# प्रस्तुत पुस्तकावरील अभिप्राय.

## प्रो० ना. सी. फडके, एम. ए., कोल्हापूर—

" डॉ. मीज याच्या उद्बोधक ग्रंथाचें तुह्मी मराठींत भाषांतर करून प्रसिद्ध केलें याबद्दल मी तुमचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. विचारप्रवर्तक व मार्गदर्शक साहित्यात तुमच्या या अनुवादानें मोलाची भर पडली आहे. "

---

## श्री. श्री. दा. सातवळेकर, संपादक ' पुरुषार्थ ' औंध—

" मानवी कुटुंब आणि हिंदुस्थान " हें पुस्तक आपणाकडून आलें तें सर्व पाहिलें. या पुस्तकातील सर्व प्रकरणें मला बरी व उद्बोधक वाटलीं. पहिल्या दोन प्रकरणात आपण हिंदु धर्मशास्त्रातील सामाजिक सिद्धान्त विशद केले आहेत. माहितीच्या दृष्टीनें ही प्रकरणें उत्तम झालीं आहेत. क्रान्तिचें आपले चवथें प्रकरण क्रान्ति करणाऱ्या तरुणास मार्गदर्शक झाल्यावांचून राहणार नाही. शेवटचें प्रकरण ' जागतिक राजकारणाचें भवितव्य ' हें प्रकरण थोडेंसे वादग्रस्तच आहे. पण त्यास आपला उपाय नाहीं. कारण जागतिक राजकारण सध्यां इतकें हेलकावे खात आहे कीं त्यांचे भवितव्य अमूकच होईल असें ह्मणणें कठीण आहे. तथापि हा प्रश्न वादग्रस्त असला तरी आपण त्यासंबंधी जे विचार या प्रकरणांत ग्रथित केले आहेत, ते विरोधकासही पुनः विचार करावयास लावतील.

एकंदरींत आपलें पुस्तक वाचनीय, उद्बोधक व विचारास वळण लावणारें आहे असें मला वाटतें."

---

**ह. भ. प. ल. रा. पांगारकर, नाशिक—**

" विकारी वाङ्मयाची चलती आहे.........ग्रंथ शिक्षितांच्या वाचनांत येईल तर त्याच्या विचाराना चागली दिशा लागेल. मी बहुतेक पुस्तक चाळलें व मला तें आवडलेही. वर्ण, वर्णसंकर व जाति या विषयीचे दोन्ही बाजूचे विचार ग्रंथात आले आहेत पण निर्णय अर्थातच केवळ सूचनेपलीकडे गेला नाहीं. विचाराकडे आपण लक्ष दिलें असून भाषागौरवाकडे दिलें नाही हें शास्त्रीय ग्रंथाला उचितच आहे. "

---

**प्रो. चिं. नी. जोशी,** एम. ए. **हैद्राबाद दक्षिण**–

" डॉ. मीज ह्याच्या इंग्रजी ग्रंथाचा 'मानवी कुटुंब आणि हिंदुस्थान' ह्या नांवानें रा. अ. स. काशीकर ह्यानीं केलेला मराठी अनुवाद मी मधून मधून वाचला. सांप्रत लेखक व वाचक ह्यांचा ललितवाङ्मयाकडे ओढा फार असल्यामुळें भारदस्त वाङ्मयाचा जनतेस विसर पडल्यासारखें झालें आहे. अशावेळीं आर्यांच्या चातुर्वर्ण्यादि समाजव्यवस्थेचें रहस्य एका पाश्चात्य पंडिताच्या ग्रंथाद्वारें वाचकांपुढें माडून रा. काशीकर यांनीं एक बहुमोल कामगिरी केली आहे असें वाटतें. अशा विचारप्रवर्तक ग्रंथाची भर मराठी वाङ्मयात घातल्याबद्दल लेखकास महाराष्ट्रजनतेकडून योग्य तें उत्तेजन मिळेल अशी आशा आहे."

---

**श्री. र. मु. जोशी, एम. ए. हैद्राबाद दक्षिण—**

विश्वाचें रहस्य उकलता यावें हा बुद्धीचा अखण्ड प्रयत्न आहे. जें आहे तें काय आहे, कसें आहे, कोठून आलें कोठें जाईल, मानव विश्वशक्तीवर प्रभुत्व गाजवील काय, त्या शक्तींचा त्याला स्वसुखासाठीं व वैभवासाठीं उपयोग करून घेता येईल काय इत्यादि प्रश्न व हेतु मनात धारण करून संस्कृतीचा रथ पुढें पुढें आक्रमण करीत आहे. मनुष्य हाच मनुष्याचा प्रधान शत्रु आहे हे प्रतीत झाल्यावर समाज-व्यवस्थेकडे बुद्धीनें लक्ष दिलें. मानवसमाजाच्या अनंत गुंतागुंतींना स्वार्थ, मत्सर, महत्वाकांक्षा याना परस्पराशीं संघर्ष न पावणारें रम्य स्वरूप यावें हा अट्टाहास आहे. उत्क्रान्त मानवसमाजात काळाच्या विनाशक शक्तीशीं झगडून अस्तित्व टिकवणारा समाज अधिक सकस असा सिद्धान्त आहे. "मानवी समाज व हिंदुस्थान" या पुस्तकाचे लेखक डॉ. गॅल्थेरस् एच्. मीज याना समाजाच्या स्थैर्यास पोषक अशीं तत्त्वें आमच्या समाजात आढळलीं आहेत. आपल्या प्रमेयाची सोपप-त्तिक मांडणी करण्याची डॉक्टरसाहेबांची पद्धति तर्कशुद्ध आहे. वाच-काच्या बुद्धीस चालना देऊन त्याला तल्लख बनविण्यास या लेखकाचे विचार फारच उपयोगी पडणार आहेत. इंग्रजींतील ही दौलत मराठी भाषेच्या पेहरावात जनतेपुढें येत आहे ही अभिमानाची गोष्ट आहे.

अनुवादक श्री. काशीकराचा प्रयत्न गौरवास पात्र आहे. कामप्रवण भावनास सुखविणाऱ्या अनेक गोडस वाङ्मयवत्याच्या जंजाळास दूर सारून, वैचारिक मूल्यवत्ता वाढवणाऱ्या या ग्रंथाकडे

श्री. काशीकरांचें आकर्षण असावें यांतच त्याचें वैशिष्ट्य आहे. काळजीपूर्वक वाचन करणारास अनुवाद सुबोध आहे. अनुवादकाचा उत्साह मनन तेवो.

---

Mr. G. A. Chandavarkar, M. A., M. R. A. S Hyderabad-Deccan–

" I have carefully gone through the Marathi rendering of this thought-provoking book by Mr. A. S. Kashikar, B. A. who has spared no pains to make it as faithful as possible. The translation by itself has many technical Sanskritic terms which are unavoidable in dealing with a subject like Sociology. Else it is both readable and enjoyable. At the present moment when the whole edifice of western civilisation and culture is shaken to its very foundations by the onslaughts of ideologies like Totalitarianism, Fascism and Bolshevism and all men of light and leading are expecting a New Order out of the chaos, it is refreshing to contemplate that ' The ancient social science of India shall provide the key to the solutions of the various social and political world-problems. ' Viewing the subject from this standpoint its study is bound to be of paramount importance, even to a lay reader. In the book subjects like Varna-Ashram Dharma, Nationalism and Internationalism and the World-State are all discussed both sympathetically and critically. If in some places it be found difficult to reconcile the theories with the postulates of modern thought, we feel confident that the approach to this subject is rational and thought-provoking. Whe

ther the NewOrder will ever revive the system of Varna and go back to the times of Manu, Plato or Aristotle, whether it is ever possible to evolve a true World-Fellowship and the Parliament of Man-human nature is so complex — one can hardly doubt as an ideal all these problems are real and their solution is within the reach of human beings. Even an institution like the League of Nations has to relate a melancholy history. Its failure is an eye-opener. The whole structure needs a thorough reconstruction. For such a purpose the book presents a valuable guide. A lay reader may not always share the views of the author but we are sure he will be filled with the sturdy optimism of a thinker like Dr. Mees. The Marathi translation being accurate, faithful and sympathetic should appeal to many readers. We do hope that the budding writer will be duly encouraged and in due course will find himself better fitted to make an original contribution to the world - thought. He has begun with the translation into Marathi of a very valuable work and we do hope he will end by some original work on a similar or allied topic. We commend the book to all serious-minded people interested in the great world problems. The getup of the book is good enough and the price also is moderate, considering the high cost of printing and paper during these war days."